# सत्त्वपरीक्षा.






हें नाटक

## रा० रा० कृष्णाजी प्रभाकर खाडीलकर.

' संगीत मानापमान, ' ' संगीत विद्याहरण, ' ' संगीत स्वयंवर, '
' त्रिदंडी संन्यास, ' ' कांचनगडची मोहना, ' ' प्रेमध्वज, ' ' भाऊ-
बंदकी, ' ' कीचकवध, ' ' सवाई माधवराव यांचा मृत्यु, '
' बायकांचें बंड, ' इत्यादि नाटकांचे कर्ते,

यांनीं लिहिलें.




तें

रा. रा. शंकर नरहर जोशी यांनीं
पुणें शहर येथें ८१८ सदाशिव पेठ येथें
' चित्रशाळा ' छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

( आवृत्ति पहिली. )

सन १९१५.

किंमत बारा आणे.

6723

# प्रस्तावना.



आपल्या आचरणानें इतरांना धडा घालून देण्याची जबाबदारी ज्यांच्यावर येते त्यांनीं प्रतिज्ञापालनाचें सत्यव्रत कां व कसें संभाळावें, ह्या प्रश्नाचें दृश्य उत्तर सत्यप्रतिज्ञ राजा **हरिश्चंद्र**, पतिव्रता राणी **तारामती**, व आईबापांच्या आत्मयज्ञांत स्वतःच्या प्राणांची आहुति देणारा राजपुत्र **रोहिदास** ह्यांच्या वीर व करुण रसांच्या मूर्तींनीं "**सत्त्वपरीक्षा**" नाटकांत दिलें आहे. स्वतःच्या बलवान् पण अस्थिर मनाला बळी पडणाऱ्या **विश्वामित्राच्या** प्रारंभीं हेकेखोर पण शेवटीं दयाळु व लवचिक होणाऱ्या वर्तनानें सत्यव्रताची दुसरी बाजू दाखविली असून, प्रतिष्ठितांच्या करारी बाण्याचा आधारस्तंभ नाहींसा होतांच समाज अप्रतिष्ठित कसा होतो, हें निदर्शनास आणण्याकरितां विश्वामित्राच्या सभोंवारच्या काशीनगरीच्या बिघडलेल्या परिवेष्टनाची—अर्थात् दिवाळखोर रत्नपाल, नटवी सुवर्णदासी, खोटें जमाखर्च करणारा चित्रगुप्त, दलाली करणारा बचंभट वगैरे उपहासात्मक पात्रांची—योजना केलेली आहे.

हें नाटक परिश्रमपूर्वक रंगभूमीवर आणून उपयुक्त सूचना केल्याबद्दल व पुस्तकांत घातलेले निरनिराळ्या प्रसंगांचे फोटो दिल्याबद्दल '**महाराष्ट्र नाटकमंडळी**'चा मी फार आभारी आहें.

ता. १६।३।१९१५ }
पुणें. }

ग्रंथकर्ता.

# सत्त्वपरीक्षा.

## अंक पहिला.

### प्रवेश पहिला.

**स्थळ**—हरिश्चंद्राचा राजवाडा.

[आमात्य व कोतवाल प्रवेश करितात.]

**आमा०:**—कोतवाल, महाराजांच्या आज्ञेचा पुकारा चोहोंकडे नीट केलांत ना?

**कोत०:**—होय सरकार, चोहोंकडे नीट केला; पूर्व, पश्चिम, उत्तर, दक्षिण, नवखंड पृथ्वीच्या सर्व राजांच्या गोटांतून द्वाही फिरविली; पृथ्वीचा असा एकही खंड शिल्लक नाहीं, कीं जेथील राजा आमच्या या आयोध्यानगरींत अधिराज हरिश्चंद्रमहाराज यांच्या राजसूययज्ञाकरितां आलेला नाहीं; तेव्हां आयोध्यानगरींत द्वाही फिरविल्यानें नवखंड पृथ्वींत द्वाही फिरविल्याचें श्रेय मिळाल्यासारखें आहे.

**आमा०:**—नवखंड पृथ्वींत तुम्ही द्वाही फिरविली असेल; पण, नवखंड पृथ्वीबाहेरच्या काशीखंडांतील लोकांना ही द्वाही कळवावयास विसरलां असाल; आणि हरिश्चंद्रमहाराजांची तर अशी इच्छा आहे, कीं त्यांच्या प्रतिज्ञेच्या सांगतेच्या आजच्या समारंभाला आलेल्या विश्वामित्र यांचे तर्फेच्या काशीखंडांतील सर्व साधुसंतांना ही द्वाही वारंवार ऐकविली पाहिजे. म्हणून म्हणतों, काशीखंडांतील लोकांच्या हृदयावर द्वाहीचीं अक्षरें उमटतील इतक्या मोठ्यानें व वारंवार त्या गोटांत द्वाही फिरविण्यास पुन्हा ताकीद द्या.

कोत०:—द्वाही ऐकून ऐकून काशीखंडांतील लोकांच्या कानठिळ्या बसतील अशी व्यवस्था केलेली आहे.

[रत्नपाल व चित्रगुप्त येतात.

रत्न०:—अधिराज हरिश्चंद्रमहाराज यांच्या प्रतिज्ञेची द्वाही काशीखंडांतील सर्व लोकांना कळली आहे. ती द्वाही ऐकून आम्हां शेटसावकारांना व व्यापाऱ्यांना तर फार आनंद झाला;—

चित्र०:—आणि मजसारख्या कारकुनी पेशाच्या लेखणींनीं तर ती द्वाही कागदावरच टिपून ठेविली आहे. आतां कोणच्याही युगांतले व कोणच्याही खंडांतले लोक ती द्वाही विसरतो म्हणतील तर त्यांचे कांहीं चालणार नाहीं; कारण, आम्ही कारकुनांनीं एकदां पांढऱ्यावर काळें केलें कीं वज्रलेप झालें. कारकुनी दवतीचा महिमाच असा आहे!—मी जमाखर्चाच्या वहींतच शेटजींच्या नावें द्वाही जमेस धरणार होतों; आणि सरकारच्या नांवें खर्चीं टाकणार होतों. कारण, एकदां जमाखर्च केला म्हणजे कोणीही असो तावडींत सांपडला, असें शेटजींचें नेहमीं म्हणणें असतें. पण मालकांच्या आज्ञेवरून धाठखरड्यावरच कच्चें टांचण केलें आहे!—कारकुनानें केलेलें कच्चें टांचणही कच्च्या रसायनाप्रमाणें गिऱ्हाइकाच्या अंगावर उठल्यावांचून राहत नाहीं!—दाखवूं द्वाहीचें टांचण वाचून?

रत्न०:—हा कारकुन—गुमास्ताही नव्हे—माझ्या पुढें पुढें करतो!—सरकारला एक हिशोब समजून द्यायाला आलों आहें; ह्या कारकुनड्यानें उगीच द्वाहीची वटवट सरकारच्या कानावर घातली; दुकानांत असें डोकें उठवितो; मला वाटतें, लोकलज्जेमुळें बोलण्याची हौस न फिटलेल्या म्हाताऱ्या बाया कारकुंड्याच्या जन्मास येतात!—हं दाखीव आतां सरकारला तो वीस लाखांचा हिशोब!

आमा०:—वीस लाखांचा कसला हिशोब!—जा, तुम्ही जा, दवंडीची व्यवस्था सांगितल्याप्रमाणें करा.—जा.

कोत०:—आज्ञा सरकार. [जातो.

आमा०:—वीस लाखांचा कसला हिशोब?

रत्न०:—घाल सरकारच्या कानावर वीस लाखांचा हिशोब.

चित्र०:—ह्या समारंभाचे वेळीं घालण्याकरितां वीस लाखांचा कंठा महाराणी सरकारनीं शेटजीपासून घेतला—

आमा०:—हो, घेतला; आणि ती रक्कम शेटजींनीं रोकडही घेतली;—

चित्र०:—त्याचा हिशोब मीं केव्हांच केला आहे.—तें कलम उलगडलें; कालचा सूर्य अस्ताला जाऊन आजचा नवीन सूर्य जसा उगवला आहे, त्याप्रमाणे आजचें हें कलम नवीन आहे.—जग म्हणत असतें सूर्य एकच आहे, पण मी म्हणतों रोजचा सूर्य नवीन समजला पाहिजे; सूर्याला काल दिलेलीं अर्घें आज उपयोगीं पडतात काय?—त्याच कंठ्याचा हिशोब आहे; पण माझ्या वहींत तें कलम आज नवीन आहे; आणि त्याबद्दल वीस लाख रुपये सरकारनीं पुन्हा भरले पाहिजेत.—मी हिशोबच नवा केला आहे.—ही कालची तारीख—ही आजची तारीख—आहेत आजचे तारखेला पुन्हा वीस लाख रुपये?—पुन्हा वीस लाख भरले पाहिजेत; त्यावांचून सुटका नाहीं.

आमा०:—पण तुम्ही दोनदां कां हिशोब लिहिला?

चित्र०:—कालची बैठक निराळी, आजची बैठक निराळी; जाजम तेंच, माणसें तींच, जिन्नसही तोच; किंमतही तीच; पण सवदा निराळा!

रत्न०:—ह्या पहा महाराणीसाहेब आल्या; त्यांनाच कंठ्याचा हिशोब विचारा. [तारामती व सुवर्णदासी येतात.

तारा०:—हा तर मोठा अपशकुनच झाला म्हणायचा!—आजच्या आनंदोत्सवाचे वेळीं मोठ्या हौसेनें कंठा घालायला काढला; आणि काय म्हणतां हा खोटा आहे म्हणून! माझ्या आनंदाचा तुम्ही विरस केलात.—कायहो शेटजी, हें तुम्हीं असें काय म्हणून केलेंत? वीस लाखांचा हा खोटा कंठा मला दिलांत, आणि खरा कंठा ह्या असल्या बाईच्या गळ्यांत!

रत्न०:—सरकार ती चूक झाली; गुन्हा माफ व्हावा; बुद्धिपुरस्सर केला नाहीं; सहज चुकून झालें.

आमा०:—काय झालें काय?

रत्न०:—दुसरें तिसरें कांहीं झालें नाहीं सरकार; काल थोडीशी नजरचूक झाली.—असले भारी किमतीचे जिन्नस रोज तिजोरींतून बाहेर काढून

गिऱ्हाइकाला दाखवीत बसलें, तर त्याच्या लकाकीवर मळ चढतो; म्हणून खोट्या हिऱ्यांचा व खोट्या मोत्यांचा मी नमुना करून ठेवतों. नमुना वारंवार दाखवितों; चौकशी झाली, घाट पसंत पडला, किंमत ठरली, नगद हातीं आली, म्हणजे खरा माल हवालीं करतों.—चोख व्यवहारांतली ही व्यापारी रीत आहे. पण काल काय मला भूल पडली, खोटा नमुना हिच्या गळ्यांत अडकावयाचा तो खराच कंठा हिनें घातला—

चित्र०:—आणि चुकून खोटा कंठा बाईसाहेबांच्या गळ्यांत पडला! सरकारनीं त्याचे वीस लाख रुपये दिलेच; तो हिशोब होऊन गेला;—तें कलम आटपलें—तो व्यवहार संपला.—आज आतां खरा कंठा सरकारनीं घालावयाचा, त्याचे वीस लाख रुपये—

**रत्न० व सुवर्ण०:**—आम्हा गरिबांच्या पदरांत टाकण्याचा हुकूम व्हावा—

चित्र०:—सरकारचें नांव आम्ही नेहमीं घेत राहूं—हरिश्चंद्रमहाराज आपल्या शब्दाला नेहमीं जागतात—वीस लाखांचीच बाब—तारामती महाराणसिाहेबांनींही आपल्या शब्दाला जागलें पाहिजे.—कालचा वीस लाखांचा हिशोब खोट्या कंठ्याचा झाला, आजचा वीस लाखांचा हिशोब खऱ्या कंठ्याबद्दल मी वहींत लिहितों—म्हणजे संपून गेलें हें कलम—जमाखर्च होऊन हिशोब होऊन पार निकाल!—कालचे रुपये सरकारच्या शब्दानें दिले, आजचे वीस लाख—मालच आहे तितका—शहाजोग व्यवहार.—हं ऐका—ही ऐका—शब्दाला जागण्याबद्दल हरिश्चंद्र महाराजांची द्वाही.

[ पडद्यांत द्वाही—" नवखंड पृथ्वींतले लोकहो ऐका; काशीखंडांतले लोकहो ऐका; राजाधिराज हरिश्चंद्रमहाराज यांच्या प्रतिज्ञेची ही द्वाही ऐका; काशीखंडांतले लोकहो ही द्वाही ऐका.—सर्वस्वाला मुकून अत्यंत हाल अपेक्षेत खिचमत पडावें लागलें तरी आपल्या शब्दाला राजाधिराज हरिश्चंद्रमहाराज जागले आहेत, जागत आहेत व जागणार आहेत; आणि जो कोणी स्वतःचे शब्दास जागणार नाहीं त्याला त्यांचें राज्यांतून बाहेर हाकलून देण्यांत येईल; अशी द्वाही या राजसूय यज्ञाचे वेळीं नवखंड पृथ्वींत फिरविण्यांत येत आहे हो!]

तारा०:—आमात्य, ह्या रत्नपालाला पुनः वीस लाख रुपये द्या. हा कंठा मीं गळ्यांत घातला होता,—खोटा कां असेना—मीं गळ्यांत घातला होता, व त्याबद्दल वीस लाख रुपये देईन असेंही म्हटलें होतें; तेव्हां पहिले वीस लाख त्या कंठ्याबद्दल समजावेत.—खरा कंठा ह्या सुवर्णदासीच्या गळ्यांत आहे—

सुव०:—(कंठा गळ्यांतून काढून) सरकारनीं हा कंठा गळ्यांत घालावा.—जवाहिऱ्याचे दुकानांत मोठमोठे दागिने गिऱ्हाइकांना दाखविण्याकरितां मखमलीनें मढविलेलीं तावदानांचीं जशीं कपाटें असतात, त्याचप्रमाणें दागिने दाखवायची शालूनें मढविलेली चालतीबोलती शेटजींची पेटी मी आहें,—

रत्न०:—आणि दुकानांतील कपाटांतला कंठा राजस्त्रियांनीं अंगावर घालण्यास जशी हरकत नाहीं, त्याप्रमाणें सुवर्णदासीच्या गळ्यांतील हार मंगलसूत्राप्रमाणें पवित्रच मानला पाहिजे.

चित्र०:—शिवाय, हाच कंठा वीस लाखाला खरेदी करण्याची महाराणीसाहेबांनीं प्रतिज्ञा केली आहे; हिशोबाच्या वह्या खरेदीविक्रीला साक्षी आहेत.—हा कंठा आतां खरेदी न करणें सरकाराला बेहिशोबी होणार आहे; सरकारचा शब्द फोल होईल.—हं—ऐका शब्दाला जागण्याची दवंडी ऐका. [पडद्यांत पूर्वोक्त दवंडी.

तारा०:—जा तुम्ही, आतां जा; आणि थोड्या वेळानें आमात्यांना भेटा, म्हणजे वीस लाख रुपये तुमच्या पदरांत ते टाकतील.—अमात्य, तो कंठा सुवर्णदासीपासून घ्या पाहूं.—हिच्या चेहऱ्याकडे, पोषाखाकडे व नटण्यामुरडण्याकडे पाहिलें म्हणजे माझ्या मनांत येतें, हिच्या स्पर्शानें दूषित झालेला तो कंठा मीं माझ्या गळ्यांत घालूंच नये.—त्या कंठ्याचें तेज कांहीं विलक्षण आहे खरें; पण थोडावेळ त्यावर दृष्टि कायम केली कीं लगेंच माझ्या मनाला अनुभव येतो, त्यांतील प्रत्येक खडा म्हणजे मोहक तेजानें मढविलेला दुःखाचा घडाच होय.—कोणातरी लायख ब्राह्मणाच्या बायकोला घालावयाला तो कंठा द्यावा; असल्या दानाचे पुण्याईनें अनिष्ट दर्शनाच्या दुखांतून तरी मी मुक्त होईन.

चित्र०:—माझ्यासारखा लायख ब्राह्मण—काशींतला—गंगातटाचा—शिवाय हिशोबी—मी सरकारचें पुण्य जमेस धरून दुःखाची बेरीज वजाबाकी करून पार नाहींसें करीन.

तारा०:—याची पहिली याचना आहे तर तो याच्याच बायकोला—

सुवर्ण०:—(कंठा गळ्यांत घालून) मग हा कंठा माझाच झाला म्हणायचा.—राणीसाहेबांच्या ह्या दानशूरत्वाबद्दल काशीविश्वेश्वरापाशीं मी अभीष्ट चिंतीत जाईन.

चित्र०:—(शेटजीस एकीकडे) शेटजी, तो कंठा तुमच्या बायकोला दान मिळाला, कां माझ्या बायकोला?

रत्न०:—(एकीकडे) तो हिशोब कसा लिहावयाचा तें मी तुम्हांला घरीं नीट समजावून देईन.—(उघड) थोड्या वेळानें सरकारच्या दर्शनाला येईन; तेव्हां वीस लाखांची मेहेरबानी होईलच.

आमा०:—जा, जा, जराशानें या.

[रत्नपाल, सुवर्णदासी, चित्रगुप्त जातात. पडद्यांत पूर्वोक्त दवंडी.

तारा०:—आमात्य, काशीखंडांतल्या या शेटसावकारांत व व्यापारी मंडळांत भरलेला खोटेपणा अशा रीतीनें अनुभवास आला म्हणजे वाटतें, प्रजाजनांनीं सत्याचरण करावें म्हणून जितके कठोर नियम अंमलांत येतील तितके चांगलेच. मला भ्रम होता, हल्लींच्या काळाला जरूर नाहीं असली कसलीशी प्रतिज्ञा तिकडून करण्यांत येत आहे; पण आतां तो भ्रम दूर झाला आहे.—काशीनगरी तर तपस्व्यांचें व विद्वानांचें माहेरघर आणि तेथीलच लोक असे खोटे कसे?

आमा०:—त्याचें कारण आहे. आयोध्येच्या गुरुपीठावर ज्याप्रमाणें वसिष्ठमहर्षि बसलेले आहेत, त्याप्रमाणें काशीच्या गुरुपीठावर सांप्रत विश्वामित्रमहर्षि बसलेले आहेत.

तारा०:—मग काशीचे लोक इतके खोटे कसे? महर्षि विश्वामित्र ह्यांच्या तपश्चर्येची बरोबरी फारच थोडे करूं शकतील; त्यांच्या नजरेखालची नगरी इतकी खोटी कां व्हावी?

आमा०:—महाराणीसाहेब, विश्वामित्रमहर्षि यांची तपश्चर्या विलक्षण,

ह्यांत शंका नाहीं; पण त्या तपश्चर्येंचीं स्वरूपें कितीवेळां बदललीं आहेत, ह्याचा कांहीं थांग आहेका? मागचा आणि पुढचा विचार प्रसंगीं ह्यांनीं कधींच केलेला नाहीं; नवीन प्रसंग आला म्हणजे ह्यांचा नाद बदलला! विकारांत, विचारांत, व तपश्चर्येंत ठामपणा नसल्यामुळें ह्यांच्या अस्थिर बुद्धीचें प्रतिबिंब सामान्य लोकांत खोटेपणानेंच दृष्टीस पडतें. चंचल व खोटा ह्यांत विशेष फरक नाहीं.

**तारा०:**—इडापीडा टळो आणि काशीनगरीच्या ह्या खोटेपणाचा संसर्ग आयोध्येस न लागो. पुत्रप्राप्तीकरितां वरुणाशीं केलेला करार खुशाल मोडावा असा विश्वामित्रानें तिकडे एकदां उपदेश केला होता; वरुणानें केलेला छळ तिकडून निमूटपणें सोसण्यांत आला, पण प्रतिज्ञा खोटी होऊं दिली नाहीं. प्रतिज्ञा पाळतांना सोसत असलेल्या त्यांच्या त्या हालअपेष्टाच मला किती तरी पूज्य वाटल्या; आणि ज्यांना तें धैर्य पहावयास मिळालें ते धन्य झाले; वरुणानें केलेली त्यांच्या देहाची जर्जर स्थितिच मला मोहक वाटली!—पण नको, तसला प्रसंग पुन्हा नको.—चला आमात्य, तिकडे जाऊं आणि विश्वामित्राच्या काशीनगरींतला खोटेपणा त्यांच्या कानावर घालूं, म्हणजे आजची प्रतिज्ञा योग्य वेळीं जाहीर केल्याबद्दल त्यांनाही धन्यता वाटेल. [ जातात.

---

## प्रवेश दुसरा.

**स्थळ**—रत्नपालाचें ठिकाण.

[ सुवर्णदासी प्रवेश करिते. ]

**सुवर्ण०:**—अरे चित्रगुप्त, अरे चित्रगुप्त.—आज हा कारकून गेला आहे तरी कुठें! राजसूययज्ञाच्या वेळच्या हळदीकुंकवाला महाराणीकडून

मला आमंत्रण आलें आहे; आणि इतक्यांतच हा चित्रगुप्त कुठें गेला? शेटजींच्या पुढें कसा नेहमीं लुडबुडत असतो; माझ्या कामाची मेल्याला आठवणच नाहीं.—हीं कारकुनं म्हणजे ताटाखालचीं मांजरें.—हें आलेंच मांजर जिभल्या चाटीत! (चित्रगुप्त येतो) कायरे, तिकडच्या ताटाभोंवतीं एकसारखें घुटमळावेंस हें चांगलें कां? तिकडच्याहून माझ्या तोंडांतून उष्टे घांस कमी पडतात, अशी तक्रार एकाही मांजरानें आजपर्यंत केलेली नाहीं; मग तूंच असा दूर दूर कां असतोस?

**चित्र०**:—मी दूर दूर कां असेन? धनी आणि नोकर हें नातें आतां उरलें नाहीं; चित्रगुप्त ब्राह्मणाची मीच बायको म्हणून आपण काल तो कंठा उपटला! मीं हें नवीन नातें वहींत लिहून ठेवलें आहे.—दाखवूं जमाखर्च?

**सुवर्ण०**:—तें तुझ्या हिशोबांतच कायमचें पुरलेलें असूंदे.

**चित्र०**:—वाचून दाखवितों—रत्नपाल शेटजीचा कारकून चित्रगुप्त ब्राह्मण याची बायको सुवर्णदासी हिच्या नावें वीस लाख रुपये जमा—

**सुवर्ण०**:—(वही घेऊन) कोण चितखाड ही—कोणी वाचावेंरे तुझें अक्षर? अरे मी शेटजींची बायको, तुझी मालकीण, असें असून कारकुंड्याची बायको म्हणून लिहून ठेवलेंस का?—माझें खेटर अडलें आहे हिशोबांत तरी कारकुंड्याची बायको म्हणवून घ्यायला? (पान फाडून) हा तुझा हिशोब (वही अंगावर फेंकून) आणि ही तुझी बायको!—आणि लिहिलेंस म्हणून काय झालें? तुझें चित्रगुप्ती अक्षर कोणाला लागणार आहे?

**चित्र०**:—हीच तर अक्षराची खुबी आहे! पाहिजे त्याचें नांव आणि पाहिजे तो जमाखर्च माझ्या लिपींतून बाहेर पडतो.—उत्तम गाणारा असला म्हणजे एका सुरांतून सर्व सूर बाहेर पडताहेतसें जसें वाटतें, त्याप्रमाणें लेखणीची एकच वेलांटी सर्व अक्षरें वीत आहेसें भासतें.—कोणाला कांहीं वाचायला येत नाहीं, म्हणून तर या वहीच्या जोरावर सपशेल खोटे जमाखर्च न्यायाधिशाकडून शेटजींनीं खरे ठरवून घेतले आहेत. अक्षर चित्रगुप्तीच असलें पाहिजे. शंकराच्या शेंडीच्या एका केंसांत गंगा जशी

गुप्त झाली त्या प्रमाणें माझ्या लेखणीच्या एका फटकाऱ्यांत क्रोडो रुपयांची जमा गुप्त झाली पाहिजे.—अग शेटजींची सर्व संपत्ति माझ्या लेखणीचा प्रताप आहे.

सुवर्ण:—कोणालारे अग अग म्हणतोस?—या कारकुंड्याला त्याच्या पायरीची नीट ओळख करून दिली पाहिजे.—समजलास चित्रगुप्त, तुझ्या जमाखर्चावर आम्ही काडीभरही अवलंबून नाहीं.—अरे, आम्ही व्यापारी श्रीमंत आहों तें खोटें बोलतों किंवा खोटे जमाखर्च करतों म्हणून नव्हे; तर कोणच्या ठिकाणीं, कोणापासून व कोणच्या मिषानें, त्याच्याच खुषीनें संपत्ति हिसकावून घ्यावी, हें आम्हांला चटदिशीं वेळेवर समजतें; आणि पटदिशीं त्या प्रमाणें आम्ही वागूनही जातों ; म्हणून संपत्ति आमच्या हातांत असते. योग्यवेळीं जबरदस्तीनें लक्ष्मीचें हरण करणाराला राजा म्हणतात, अयोग्यवेळीं जबरदस्ती करणाराला दरोडेखोर म्हणतात; योग्य लालुचीनें संपत्तीचें हरण करणाराला व्यापारी म्हणतात; आणि अयोग्य वेळीं लालुची दाखविणाराला फसव्या म्हणतात; राजा व दरवडेखोर—व्यापारी व फसव्या—यांची खुबी समजते पण वेळही कळत नाहीं व वर्तनही हातून होत नाहीं, त्याला चित्रगुप्त कारकून म्हणतात.—तेव्हां तुम्ही करकुनांनीं आमच्या उष्ट्यावरच—राजाच्या किंवा चोराच्या—व्यापाऱ्याच्या किंवा फसव्याच्या—उष्ट्यावरच उपजीविका केली पाहिजे समजलास ?

चित्र०:—खरें आहे बाईसाहेब; काल माझी जीभ जर चटदिशीं वदली असती—ही माझी बायको नव्हे, बायको घरीं आहे,—तर वीस लाखांचा कंठा नसता मिळाला ? पण खोटेंच बोलवलें नाहीं,—

सुवर्ण०:—मोठा आला आहे हरिश्चंद्र खोटें न बोलायला ! बायको माहेरीं गेली असतांना मेहुतराचें आमंत्रण आलें तर अरे एखादी चवंनी दक्षणा अधिक मिळावी म्हणून शेजाऱ्यापाजाऱ्या आईबहिणीला बरोबर जेवावयाला नेणारे कांहीं ब्राह्मणध्रुव नाहींत, असें नाहीं; पण गध्या, कारकुनी लेखणींत जीव कोठें आहे ? खोटें बोलवत नाहीं असें नव्हे, तर पटदिशीं खोटें बोलण्याइतकी तरतरीच नाहीं. लागेल तितकें खोटें बोलशील, पण धाडस कुठें आहे ? दुबळें शरीर, भित्रें मन, आणि कुचकी बुद्धि,—अशीच

लपत छपत यायची, पुसट पुसट बोलायची, आणि लाळ घोटत दुसऱ्याच्या घरांत कुत्र्याप्रमाणें पडून रहायची.—असें वर तोंड करून मजकडे पाहूं नकोस.—कारकून होण्यापलीकडे तुझी काडीचीही योग्यता नाहीं; समजलास?

चित्र०:—पण मी कुठें माझी योग्यता अधिक आहे असें म्हणतों? आपण निरंतर खोटें वागावें आणि मी निरंतर खोटें लिहावें, असा हा संयोग आहे.—पण खोटें बोलणाराला जर वीस लाख तर खोटें लिहिणा-राला कांहीं तरी?

सुवर्ण०:—अन्नछत्रांत जाण्याची किंवा मधुकरीचें फडकें फिरविण्याची पाळी न येतां—उष्टें कां होईना पण—इभ्रतीनें खायाला मिळतें, हें काय कमी झालें?—इतकें हिरमुसलें तोंड करूं नकोस; अरे, आतां मी सांगणार आहें ती कामगिरी नीट करून दाखीव, म्हणजे कालचा तो खोटा कंठा तुझ्या बायकोला मीच बक्षीस देईन.

चित्र०:—बाईसाहेबांचें काम मीं कधीं ऐकलें नाहीं? पेढीवर जमा होईल ती बाईसाहेबांच्या नांवची लिहीत जाईन, आणि खर्च सगळा शेट-जींच्या नांवचा लिहीन; ह्या जमाखर्चाचा उपयोग आजच कांहीं नाहीं, पण कधीं काळीं शेटजी निवर्तले—त्यांचें म्हातारपण झाले आहे म्हणून, राग न व्हावा—कारकुनाच्या चाळशीला दुप्पट लांबचें गुप्तविस सर्व दिसतें—

सुवर्ण०:—ह्या तुझ्या चाळशीला गुप्त दिसतें म्हणूनच तुला काम सांगणार आहें.—हें पहा ही बातमी काढून आण.—महाराणी मिरवणुकीच्या वेळेला शालू कोणचा नेसणार, चोळी कसली घालणार, शेला कोणचा पांघरणार, जोडा कसला घालणार, आणि भांग कोणच्या बाजूला काढणार—नखशिखांत बातमी पाहिजे. राणीनें जर उजव्या बाजूला भांग काढला तर मी डाव्या बाजूला काढणार—तिनें सूर्यचंद्र मोत्याचे डाव्या बाजूला डोक्यावर बसविले, तर मी हिऱ्याचे उजव्या बाजूला घालणार,—आणि हें पहा, माझ्या जोड्यावर जडावाचे सर्व तारे चमकले पाहिजेत; राजा हरिश्चंद्राहून अधिक लकाकीची लक्ष्मी शेटजींच्या बायकोच्या पायांत लोळत असते, असें सर्वां-च्या नजरेस आलेंच पाहिजे.—मी आतां तिकडे जातें. प्रत्येक समारंभाला मला नवीन शालू, नवा शेला, नवी चोळी, नवे दागिने व नवा थाट



१०:—पडेल तें काम करायला मी काय कारकून आहे ? [ पृ. [illegible]१.

पाहिजे असा हट्ट धरून बसतें. कोण आहेरे तिकडे देवडीवर? चतुर्भुज ए चतुर्भुज. [चतुर्भुज येतो.

चतु०:—बाईसाब, चाकुर हजर हाय.

सुवर्ण०:—अरे राजवाड्यांतून परत यायचें झालें कीं नाहीं तें पाहून ये पाहूं.

चतु०:—बाईसाब देवडीवर पाहरा करायचें तेवढें काम या चतुर्भुजाचें; पडेल तें काम करायला मी काय कारकून आहें?—ह्यासनी सांगा तें काम. देवडीवर बसतों बाईसाब. [मुजरा करून जातो.

सुवर्ण०:—चित्रगुप्त, राजवाड्यांतून यायचें झालें असेल तर तुम्हीच त्यांना मजकडे पाठवून द्या.

चित्र०:—आज्ञा बाईसाहेब.—(सुवर्णदासी जाते.) मी भिक्षुकाचा कारकून झालों; पण ह्या धंद्यांतही नशीब उदयास चढेलसें दिसत नाहीं; कारण कारकुनाची पायरी गडीमाणसाहूनही आजकाल खालीं उतरलेली दिसते! अन्नछत्रांत किंवा सहस्रभोजनांत खीर भुरकतांना दर घासाला मिंदेपणा भिक्षुकांना वाटतो; कारकुनांना भाकरीचे तुकडे मोडतानां आपले आपण मालक आहों असें भासतें खरें; पण अष्टौप्रहर यजमानाच्या लहरीची तब्येत अशी सांभाळावी लागते!—भिक्षुकाचा कारकून झाल्यानें 'इदंच नास्ति परं न लभ्यते' असें झालें आहे. श्राद्धपक्षाच्या वेळचें शाल्योदनही गेलें आणि कारकुंडा म्हणून वैभवालाही नालायक ठरलों. मीं तर निश्चय केला आहे शेटजींच्या सहवासांत राहून स्वतः दुकानदार किंवा कारखानदार दोन चार वर्षांत झालों तर बरें, नाहीं तर लेखणी गंगेला अर्पण करून दर्भ पुन्हा हातांत घ्यावयाचेच.

[जातो.

---

## प्रवेश तिसरा.

**स्थळ**—राजा हरिश्चंद्राचा महाल.

[ सिंहासनावर राजा हरिश्चंद्र, तारामती, रोहिदास बसले आहेत; आमात्य, शेटसावकार, गुरूपुरोहित, ऋषी, तपस्वी वगैरे बसले आहेत; असा देखावा. ]

हरि०:—आमात्य, पुत्रप्राप्तीकरितां वरुणाशीं केलेली प्रतिज्ञा मीं अक्षरशः पाळली, म्हणून ऋषिवर वसिष्ठगुरू यांच्या आज्ञेप्रमाणें आजच्या राजसूय यज्ञाच्या महासभेंत मी आज नवी द्वाही जाहीर करणार आहें. पुत्रयज्ञ करून वरुणाच्या ऋणांतून मीं मुक्त होण्याचा उद्योग जेव्हां आरंभिला, व पुत्रयज्ञ पार पडणें जेव्हां दुरापास्त झालें, त्या वेळीं क्रुद्ध झालेल्या वरुणानें कर्ज वसूल करण्याकरितां जलोदर रोगाचें धरणें माझ्या शरिरांत बसविलें; मी मुकाट्यानें माझें शरीर जलोदराच्या हवालीं करून अष्टोप्रहर भयंकर यातना सोसण्यास तयार झालों; पण शब्दछलाचे जोरावर देणें नाकारलें नाहीं किंवा दया भाकून सूट मागितली नाहीं. दुःख सोसण्याचे वेळीं मी दाखविलेला हट्ट पाहून वरुण देवता संतुष्ट झाली, व जे राजे सत्याकरितां दुःख सोसतील त्यांच्या राज्यावर अमृतवृष्टि करून मी रोगांचा बीमोड करीन व वसुंधरेच्या पोटांतील द्रव्य प्रजाजनांच्या गोठांत भरपूर सांठवून ठेवण्याइतकें धनधान्य व फलपुष्प उतन्न करीन, असें वरुणराजानें मला आश्वासन दिलें. सत्याचरणाचा व सत्यपालनाचा जो मंत्रोपदेश वसिष्ठगुरूंनीं मला केला तो उपदेश आज फलद्रूप झाला आहे, व ह्या परमसुखाचे भागीदार माझे प्रजाजन निरंतर व्हावेत म्हणून सत्याचरणाची राजाज्ञा आजच्या महासभेंत मी जाहीर करवीत आहें.— आमात्य, सत्याचरणाची द्वाही ह्या महासभेला ऐकवा.

आमा०:—[ पूर्वोक्त दवंडी ]

हरि०:—ऐका, सभ्यहो, पुन्हा पुन्हा ही द्वाही ऐका. आमात्य, कोत-

वाल, हें सभास्थान द्वाहीच्या मंत्रोपदेशानें दुमदुमून जाऊंद्या.—एवढ्या मोठ्यानें हा मंत्र उच्चारा कीं, हिमाचलांत तपश्चर्येकरितां गेलेल्या माझ्या वसिष्ट ऋषीला समाधींतही द्वाहीचा महाशब्द ऐकूं गेला पाहिजे, व सत्याचेंच शब्दमय प्रत्यक्ष दर्शन त्यांना होऊन सत्याचरणास वाहिलेल्या ह्या त्यांच्या शिष्याच्या कृतीबद्दल समाधींतही त्यांनीं डुलत राहिलें पाहिजे.—ऐकवा, पुन्हा मोठ्यानें ती द्वाही सर्वांना ऐकवा.

आमात्य, कोतवाल वगैरे०—[सर्व मिळून द्वाही पूर्वोक्त]

हरि०:—काशीखंडांतील शेटसावकारहो, ही द्वाही आपण मुद्दाम ऐका, आणि काशीविश्वेश्वराचे सन्निध गंगाकिनारीं तपश्चर्येला बसलेल्या माझ्या गुरूच्या प्रतिस्पर्ध्याला—महर्षि विश्वामित्राला कळवा, राजांनीं दुसऱ्यावर दया करावी पण स्वतः कितीही हाल सोसावे लागले तरी दुसऱ्यास दिलेलें वचन आपण होऊन कधींही मागें घेऊं नये, अशा तऱ्हेच्या सत्याचरणानेंच राजा प्रजेचें हित अधिक करूं शकतो. ह्या हरिश्चंद्रराजानें हीच सत्याचरणाची तपश्चर्या आजपर्यंत केली आहे; आणि विश्वामित्राच्या चंचल तपश्चर्येहून आयोध्यानगरीस अधिक फलद्रूप तीच तपश्चर्या वसिष्टमहामुनींच्या आशिर्वादानें झाली आहे.—काशीखंडांतील सभ्यहो, आपण इतक्यांदा माझ्या प्रतिज्ञेची द्वाही ऐका कीं, काशीखंडांत परत गेल्यावर माझी प्रतिज्ञा विश्वामित्राला सांगण्याचें विस्मरणच तुम्हांला होऊं नये. महर्षि विश्वामित्र यांना वारंवार सांगा— [विश्वामित्र येतो.

विश्वा०:—सांगा, काय सांगा?—वारंवार काय सांगा? घमेंडखोरा, तूं ह्या विश्वामित्राला काय वारंवार सांगणार? माझी तपश्चर्या चंचल आणि तुझ्या गुरूची अढळ, हेंच मला सांगणार ना?

हरि०:—ऋषिवर, होय. हाच सिद्धांत सिंहासनावर बसून मी जगास जाहीर करीत आहें. वरुणाशीं मीं केलेल्या प्रतिज्ञेचा शेवट असाच झाला नाहीं काय? वरुणाची दया भाकून वरुणदेवता जितकी संतुष्ट झाली असती त्याहून अधिक प्रसन्न वरुणदेवता माझ्या सत्याचरणाचे व्रतामुळें झाली नाहीं काय? त्या माझ्या तपश्चर्येचें फल म्हणून सत्याचरणाची

राजाज्ञा आयोध्येच्या सिंहासनावर बसून विश्वामित्र महर्षींचे समक्ष मी जाहीर करीत आहें. महासभेला पुन्हा द्वाही ऐकवा. [द्वाही पूर्वोक्त.

विश्वा०:—बंद करा; ही द्वाही बंद करा.

हरि०:—कां, कां बंद करा?

विश्वा०:—असली द्वाही फिरविण्याची योग्यता तुझी नाहीं म्हणून; समजलास हरिश्चंद्रा.—सत्याचरणाचे खडतर परीक्षेला तूं कोठें उतरला आहेस? सत्यपालनाचें निष्ठुर व्रत तूं कोठें पाळलें आहेस? राजा, वरुण-देवतेशीं केलेल्या कराराप्रमाणें तूं पुत्रयज्ञ केलास काय?

हरि०:—पुत्रयज्ञ करण्याचें मीं केव्हांच नाकारलें नाहीं.—पुत्रयज्ञ माझ्या हातून पार पडला नाहीं ही गोष्ट खरी, पण वरुणानें फर्मावलेली शिक्षा मीं निमूटपणानें सोसली, म्हणून मला वरुणानें करारांतून मुक्त केलें.

विश्वा०:—राजा, गतगोष्टी विसरूं नकोस. विकत घेतलेल्या पुत्राचा यज्ञ तूं आरंभिला होतास; त्या विकत घेतलेल्या पुत्राला तुझ्या स्वतःच्या पुत्राप्रमाणेंच आत्मयज्ञाच्या यातना सोसवेनात; त्या वेळीं वरुणाची दया मीं भाकली, आणि त्यामुळें तूं करारांतून मुक्त झालास.

हरि०—पण आपण तसें केल्याबद्दल भार्यायज्ञ, पुत्रयज्ञ, किंवा इतर मानवयज्ञ वगळून सांगाल तसला द्रव्ययज्ञ करण्यास मी तयार आहें, असें आपणास वचन दिलें—

विश्वा०:—होय, वचन दिलेंस; आणि तें वचन पुरें होईतों सत्या-चरणाच्या घमेंडीची द्वाही फिरविण्याचा अधिकार तुला नाहीं, असें मी म्हणतों.—राजा, गंगाकिनारीं जेव्हां तुझ्या द्वाहीच्या खटपटीची बातमी माझ्या कानीं पडली तेव्हां त्या द्रव्ययज्ञाच्या प्रतिज्ञेचें पालन तुझ्या हातून कितपत होतें हें पाहून तुझ्या सत्याची परीक्षा घेण्याकरितां मी येथें धांवत आलों. महासभेंत तुझी द्वाही जाहीर होण्यापूर्वी मी येथें येऊन पोंहोचलों आहें; आणि असली द्वाही फिरविण्याची घमेंड जर तुला मिरवावयाची असेल तर द्रव्ययज्ञाचें वचन तूं पाळलें पाहिजेस.

हरि०:—ह्याच क्षणाला तें वचन पाळतों; आणि ह्याच क्षणाला द्वाही फिरवितों.



हरि०:—झालों, आपल्या वचनांतून मुक्त झालों !

[ पृ. १५

विश्वा०:—पाळतोस वचन?

हरि०:—हो हो पाळतों; ह्या क्षणाला पाळतों; आपण जें मागाल तें आपणाला ह्या क्षणाला देतों. ऋषिवर, द्रव्ययज्ञाची माझी प्रतिज्ञा पुरी झाली असें म्हणण्याकरितां जें मागाल तें आपणाला ह्या क्षणाला देतों.

विश्वा०:—राजा, त्रिवार प्रतिज्ञेचा उच्चार कर; विचार करून उच्चार कर. इच्छा असेल तर द्वाही मागें घे, म्हणजे तुझ्या सत्त्वाची परीक्षा घेण्याचेंही मला आज प्रयोजन रहाणार नाहीं.

हरि०:—त्रिवार वचन देतों; आपण मागाल तें आपणांस ह्या क्षणीं देतों; आपण मागाल तें आपणास ह्या क्षणीं देतों; आपण मागाल तें आपणांस ह्या क्षणीं देतों.

विश्वा०:—घमेंडखोरा, अविचाऱ्या, सोड, सिंहासनाचा हक्क सोड; आणि तुझी भार्या व तुझा पुत्र हीं वगळून तुझ्या राज्यासकट जेवढी म्हणून तुझी संपत्ति व मालमत्ता आहे ती सर्व ह्या विश्वामित्राच्या चरणावर अर्पण कर.

हरि०:—(सिंहासनावरून उठून) ऋषिवर, माझी सर्व सत्ता, माझी सर्व संपत्ति, माझी सर्व मालमत्ता आपणांस अर्पण केली आहे; ज्या वस्तूला यत्किंचितही किंमत आहे व जी माझ्या मालकीची आहे ती वस्तु आपणास दिली आहे; आणि ह्या दानाची मूर्तिमंत साक्ष म्हणून ह्या क्षणाला हा राजमुकुट आपले चरणावर ठेवीत आहें.(राजमुकुट विश्वामित्राचे चरणावर ठेवतो.) झालों, आपल्या वचनांतून मुक्त झालों?—करा, जाहीर करा, विश्वामित्रमहर्षींचे समोर माझी राजाज्ञा जाहीर करा;—हरिश्चंद्राची राजाज्ञा—

विश्वा०:—राजाज्ञा? राजाज्ञा! हरिश्चंद्रा, तूं आतां राजा नाहींस.—अरे, तूं आतां राजा नाहींस, रंक आहेस, रंक.

हरि०:—रंक असो वा शतदरिद्री असो, मीं माझी प्रतिज्ञा पुरी केली आहे; आणि सत्याचरणाचें महात्म्य जगाला जाहीर करण्याचा अधिकार मला प्राप्त झाला आहे.—ऐका, नवखंडपृथ्वीचे राजे हो ऐका, काशीखंडांतील शेटसावकार हो ऐका, विश्वामित्राचे मठांतील तपस्वी हो ऐका, वसिष्ठ महर्षींचा हा शिष्य हरिश्चंद्र सत्याचरणासाठीं राजाचा रंक

झाला आहे, आणि हा सत्ताहीन दरिद्री हरिश्चंद्र सर्व जगाला आपली सत्याचरणाची द्वाही जाहीर करीत—

**विश्वा०**:—थांब, हरिश्चंद्रा, थांब; घमेंडखोरा थांब; तुझा द्रव्ययज्ञ अद्याप पुरा झाला नाहीं; अपुऱ्या दानाचें फल चाखण्याचा आनंद तुला कोठचा मिळेल? हरिश्चंद्रा तूं सर्वस्वाचें दान केलेस खरें, पण त्या दानाची पूर्तता होण्याकरितां तूं दक्षणा कोठें मला अद्याप दिली आहेस? तांबुलाशिवाय भोजन जसें व्यर्थ, वस्त्राभरणाशिवाय सौंदर्य जसें फिकें, शिखराशिवाय देवालय जसें अशुभ, त्याप्रमाणें सुवर्णदक्षणेशिवाय तुझें राज्यदान निष्फळ; हा धर्म आहे.–एक हजार मोहरा दक्षणा माझ्यापुढें प्रथम मोज, आणि नंतर तुझ्या सत्याचरणाची टिमकी खुशाल वाजीव.

**आमा०**:—मी आतां खजिन्यांतून हजार मोहरा आणून आपणापुढें मोजतों.

**विश्वा०**:—अरे कोणाचा खजिना आणि कोणापुढें मोजतोस? जगांत अशी एकही चिंधी नाहीं कीं, जिच्यावर ह्या हरिश्चंद्राची आतां सत्ता उरली आहे.

**तारा०**:—हे माझे अलंकार दक्षिणेकरितां घ्यावेत.

**विश्वा०**:—ते आपले अलंकार नव्हेत; राज्यदानानें त्यावरची सत्ता मला मिळाली आहे. हरिश्चंद्र, तारामती, किंवा रोहिदास, ह्या त्रिवर्गांना ह्या क्षणापासून आकाशाशिवाय आच्छादन नाहीं, सार्वजनिक रस्त्याशिवाय, पशूंच्या जंगलाशिवाय किंवा पक्षांच्या गिरिशिखरांशिवाय पृथ्वीवर थारा नाहीं, आणि ज्यांना मालक नाहीं अशा फलमूलाशिवाय स्वतःचें अन्न नाहीं. हीं शरीरें मात्र अद्याप तुमच्या मालकीचीं आहेत. हीं शरीरें झिजवून, राबून, दुसऱ्याची नोकरी करून माझ्या हजार मोहरा तुम्ही फेडल्या पाहिजेत, किंवा हीं शरीरें अजिबात विकून धनाढ्याचे गुलाम होऊन माझ्या ऋणांतून मुक्त झालें पाहिजे.

**हरि०**:—हें दारिद्र्याचें निष्ठुरव्रत पाळण्यास मी तयार आहें. ऋषिवर कोणचेंही बी रुजत घातलें तर तें फळास येण्यास कांहीं काल जावा लागतो; कोणचीही तपश्चर्या सुरू केली तरी सिद्धी प्राप्त होण्यास कांहीं

काल जावाच जावा लागतो; किंबहुना विश्वांतील सर्व दृश्य संपत्ति व सर्व सामर्थ्य अदृश्य कालाचेंच मूर्तस्वरूप असल्यामुळें कोणच्याही संग्रहाचा उद्योग कालभक्षक असतो; ह्या धर्माला अनुसरून दक्षणेच्या हजार मोहरांचे ऋण फेडण्यास मुदत मागण्याचा हक्क मला पोंचतो.

**तारा०:**—मुदत कशाला पाहिजे? ऋषिवर, आत्तांपर्यंत माझ्या सासरचें व माझ्या माहेरचें जें जें म्हणून माझें होतें तें सर्व धन आपलें झालें, हें खरें; पण आतांच्या आतां जाऊन मी माझ्या भावाकडून हजार मोहरा मागून आणतें; व आपली दाक्षिणा देऊन टाकतें.

**विश्वा०:**—विचार, मुली, प्रथम तुझ्या नवऱ्याला विचार; तुझ्या भावाची हजार मोहरांची भीक पदरांत घ्यायला हा घमेंडखोर तयार आहे काय, हें प्रथम हरिश्चंद्राला विचार.—हरिश्चंद्रा, भीक मागूनच पोट भरणार असलास, भीक मागूनच बायकांमुलांचें पोषण करणार असलास, भीक मागूनच माझें कर्ज फेडणार असलास, तर हा विश्वामित्र तुझ्या मेहुण्याहून अधिक दूरचा आहे असें समजून मजपाशीं भीक मागण्यास शरमूं नकोस. तुझा सखासोयरा मी आहे इतकेंच नव्हे तर विश्वाचा मी खराखुरा मित्र आहे. मी दयेनें सर्व विश्वाकडे पहातों, मी दयेनें सर्व पाप्यांना जवळ करतों, मी दयेनें सर्व पतितांचा हात धरतों; मीं पुष्कळ प्रतिज्ञा केल्या, सिद्धीकरितां अनेक वेळ उग्र तपश्चर्या केली, पण शेवटीं मी माझ्याच प्रतिज्ञा मोडल्या; हट्टांत जितका जीव आहे तितकाच जीव कालाच्या चंचलतेवर दया करण्यांत आहे असा माझा अनुभव असल्यामुळें, चपल कालाच्या वाहत्या रसाला तुच्छ मानून कालाची शेंडी हतांत धरून आसन स्थिर करून त्याला निश्चल करूं पहाणारे वसिष्ठासारखे मुनी सुखाला स्वतः आंचवतात व इतरांनाही आंचवितात, असा मला साक्षात्कार झाला आहे. म्हणून म्हणतों, बोलेन तसाच वागेन, ही नसती घमेंड, हरिश्चंद्रा, धरूं नकोस. कोण काडीसाठीं खोटें बोलतो व वागतो तर कोण राज्यासाठीं खोटें बोलतों व वागतों; खंबीर मनही तशाच प्रसंगीं लेचेंपेचें होतें; तसाच धनुर्धर भेटला म्हणजे वज्रालाही लवण्याचा धडा शिकावा लागतो. म्हणून म्हणतों, हरिश्चंद्रा, दुसऱ्याचें—मग तें तुझ्या बायकोच्या माहेरचें किंवा

ह्या आमात्याच्या घरचें—धन घेऊन माझें ऋण फेडण्याइतका द्रव तुझ्या करारी बाण्याला जर ह्या क्षणीं आला असेल—मजपुढें तसे शब्दही उच्चारण्याचें कारण नाहीं—नुसत्या दोन मुद्रेनें मजकडे पहा म्हणजे तुला तुझ्या वचनांतून ह्या क्षणीं मी मुक्त करतों. कां असा खालीं पहातच उभा कां राहतोस? अधोमुख हें दीनपणाचें लक्षण मी समजूं का?

हरि०:—ऋषिवर, मी कच्या गुरूचा शिष्या नाहीं; वज्र लवेल पण हरिश्चंद्राचें मन खंबीर राहील, हरिश्चंद्र एकच वाचा बोलेल, व हरिश्चंद्राचे पाय एकच वाट चालतील. मी स्तब्द उभा राहिलों तें दारिद्र्याला भिऊन नव्हे, किंवा कष्ट करून कर्ज फेडण्याच्या प्रसंगानें गांगरून जाऊन नव्हे.—मुदत मागण्याचा हक्क धर्माप्रमाणें मला आहे, आणि ह्या मुदतीची सीमा आपल्या तोंडून ऐकण्याची वाट मी पहात आहे.

विश्वा०:—करारीपणाच्या अरेरावी कांद्या, तुला धर्मानुसार मुदतच पाहिजे तर ती ऐक. मुदतीचें स्थलही तुला सांगतों.—हरिश्चंद्रा, तूं ह्यापुढें नवखंड पृथ्वींत राहतां कामा नये. स्वतःच्या कष्टानें कर्ज फेडण्याची तुला घमेंड आहे; नवखंडपृथ्वींतील राजे तुझे नातेवाईक व इष्टमित्र असल्यामुळें तुझ्या कष्टाला जीं फळें सामान्यतः यावयाचीं नाहींत तीं फळें तुझे आप्तइष्ट स्वतःच्या पुण्याईनें बळेंच चिकटावतील. तेव्हां हरिश्चंद्रा, नवखंड पृथ्वीबाहेरच्या काशीखंडांत जा. तूं राजा होतास ह्या सबबीवर तुला भलतीच सवलत देण्याला काशीस कोणीच राजा नाहीं. पंचमुखी परमेश्वर ह्या न्यायानें काशीस महाजन पंच व्यवहारसभेंत बसतात व कोतवाल व्यवहार चालवितो. अशा काशीखंडांत जाऊन स्वतःच्या कष्टानें एक हजार मोहरा संपादन करून, हरिश्चंद्रा एका वर्षाचे आंत,—पहिल्या सहा महिन्यांत पांचशें व दुसऱ्या सहा महिन्यांत पांचशे—अशा दोन हप्त्यांनीं तूं मला काशीविश्वेश्वरासमोर दिल्या पाहिजेस.

हरि०:—काशीवास करून स्वकष्टानें मिळवून एक हजार मोहरांची दक्षणा दर सहा महिन्यांत पांचशें ह्याप्रमाणें एक वर्षाचे आंत काशीविश्वेश्वराला साक्षी ठेवून मी आपणास देईन. [पडदा पडतो.

---

## प्रवेश चवथा.

स्थळ--काशी, गंगाकिनारा उत्तरभाग.

[ बचंभट, त्रिवेदी व चौवेदी हातांत वह्या घेऊन प्रवेश करितात

त्रिवे०:—अरे बचंभट, तूं किती वेद शिकला आहेस? आमच्या कुळांत कोणापाशीं वेदाच्या तीन पोथ्या होत्या म्हणून मला त्रिवेदी म्हणतात. आमच्या पणजोबानें त्या पोथ्या वाण्याला रद्दी म्हणून विकल्या तरी मी अद्याप त्रिवेदीच आहें.

चौवे०:—आमच्या कुळांत चार पोथ्या होत्या आणि त्रिवेद्याहून आम्ही चौवेदी हुषार पडलों, म्हणूनच ए त्रिवेदी, माझ्या वडिलांनीं चारवेदांच्या रद्दीच्या त्या पोथ्या वाण्याला न देतां हलवायाला विकल्या; मला लहानपणची आठवण आहे किती खाऊ आणला होता त्यावेळीं!—कायरे बचंभट आम्हा पंड्याप्रमाणें तुम्ही वेदांची रद्दी कां विकत नाहीं? तुझ्या घरीं चार पांच वेदांची रद्दी आहे काय?

बचं०:—तुम्ही पंडे हे असे अक्षरशून्य; म्हणून सांडलेले वेद हलवायाच्या दुकानांतून आम्हा दाक्षिण्यांना हुडकून काढावे लागतात. मी दक्षिणी खरा; पण वेद बिद पाठ करण्याच्या भानगडींत मी पडत नाहीं; आडवलेल्या नदीच्या पाण्याच्या तोंडाचे ठिकाणीं जाळें पसरून बेसावध माशांचा तांडा हुषार कोळी जसा पकडतो त्या प्रमाणें काशीचे रस्ते रोखून यात्रेकरूंचा कळप पकडण्याची तुम्हा पंड्यांची शिताफी मला फार आवडते. वेद म्हणा, शास्त्रें पहा, भक्तीनें पूजा अर्चा करा, ही उठाठेव सांगितली आहे कोणीं?

त्रिवे०:—दहावीस यात्रेकरूंना लगाम घालावी—

चौवे०:—पांच पन्नास मूर्ख जजमान गांठावे—

बचं०:—शें पन्नास वेड्यांना तर्पण करायला बसवावे—

तिघे:०—( मिळून ) आणि पंड्यांनीं बासुंदी पुरी यथेच्छ झोडावी! हा उत्तम धंदा!

बचं०:—हा उत्तम धंदा! मला हा फार आवडतो. आमच्या गांवचा तो चित्रगुप्त मला हिशोब लिहवायला शिकवीत होता; पण विंध्याचलांत भिल्ल जसे प्रवाशांना लुटतात त्या प्रमाणें यात्रेकरूंना लुबाडण्याची पंडेगिरी मला अधिक आवडत असल्यामुळें मीं हिशोबांच्या वह्या गंगेंत फेकून देऊन यालेकरूंचे पितर खाकेंत मारले आहेत. आज माझे खाकेंत कोणाचे पितर आहेत सांगा पाहूं?

त्रिवे०:—रामेश्वराहून आलेल्या क्षौरी महाशयांच्या तोंडाला तुझ्या खाकेंतले केस खुपत असतील झाले!

चौवे०:—किंवा एखाद्या तुपकट तेलकट गुजराथ्याला खाकेंतल्या घामानें न्हाऊं घालीत असशील झालें!

बचं०:—अगदीं चुकलें. तुम्हां पंड्यांना धोरणच नाहीं. तुम्हाला अक्कल असती तर गंगाकिनारचे पिंड आम्हां दक्षिण्यांच्या घरांत कशाला पडले असते! तुम्हां पंड्यांना गुप्त बातमी कोठे काढतां येते? काल चित्र-गुप्ताकडून मला गुप्त बातमी समजली,—

त्रिवे०:—कोणती!

बचं०:—आयोध्येचा राजा हरिश्चंद्र लवकरच काशीयात्रेला येणार आहे म्हणून. लगेच मी आयोध्येच्या सगळ्या राजांची वंशावळ या वहींत उतरून काढली! ह्या वहींत आयोध्येच्या सगळ्या प्रधानांचे व मांडलिकांचे वाडवडील कालरात्रीं मीं टिपून टाकले आहेत; राजा हरिश्चंद्राचे सैन्यांतील सर्व सैनिकांनीं काशीयात्रा केली होती आणि बापजाद्यांचे पिंड माझ्या मालकाचे पडवींत टाकले होते, हें ह्या वहीवरून सिद्ध होणार आहे. कोणाला बाप असो वा नसो, त्यानें काशीयात्रा केली असो वा नसो, माझ्या वहींत त्याचा बाप निघायचा, त्याचा पणजोबा नरकांत कांहीं वर्षे कुचमत पडून माझ्या मालकानें 'तेरे पितर सर्ग भयो' म्हटल्याबरोबर कोणच्या भित्तीला नरकांतून स्वर्गांत घुसला, ती तिथिवार नक्षत्र—सर्व कांहीं ह्या वहींत सांपडावयाचें! माशांना पकडण्याला नुसतें जाळें पसरून भागत नाहीं, अमिषही असावें लागतें. आज आयोध्या नगरींतील लोकांना त्यांचे स्वर्गां-तले पितर हा पठ्या ह्या वहींत दाखविणार! आयोध्येचा कोणचाही प्राणी

आतां येऊंदे, त्याच्यापुढें ही वही मीं टाकणार, आणि म्हणणार तुझ्या पितरांना मीं स्वर्गाची वाट दाखविली, तूं मेल्यावर तुलाही मी स्वर्गाची वाट दाखविणार, तेव्हां जिवंतपणीं काशीची वाट—

[तारामती व रोहिदास भिकार वेषांत येतात.

तारा०:—काशीची वाट आम्हांला दाखवाल काय?

रोहि०:—काशीची वाट आम्हाला सांगतां का?

बचं०:—तुम्ही कोण? नांव काय? बापाचें नांव काय? आजाचें नांव काय? उपाध्या कोण? पंड्या कोण? कोणच्या गांवच्या? माझ्या वहींत तुमचें नांव असलेंच पाहिजे.

तारा०:—अहो, आम्ही यात्रेला आलों नाहीं.

रोहि०:—यात्रेला आम्ही आलों नाहीं.

चौवे०:—नसला म्हणून काय झालें; यात्रा केली म्हणजे झालें; तुम्ही दोघे आहां आणि मी चौवेदी आहें, 'बेबे चार' तेव्हां मीच तुमचा पंड्या.

रोही०:—माझे बाबा, आई, आणि मी असें तिघे आहों.

त्रिवे०:—तिघे असलां तर मी त्रिवेदी; मीच तुमचा पंड्या.

बचं०:—गप्प बसारे पंड्यानों, उगीच बाजार माजवूं नका; रिकामी बडबड वटवट नको. बाई मीच तुमचा उपाध्या; तुम्ही यात्रा नाहीं केली तरी चालेल, दक्षणा भरपूर द्या म्हणजे झालें; गंगास्नान तुम्ही केलेंच पाहिजे किंवा काशीविश्वेश्वराचें दर्शन घेतलेंच पाहिजे, असें आमचें म्हणणें नाहीं; पण उपाध्या मात्र तुम्ही पूजिला पाहिजे; आणि मुठीनें—ओंजळीनें—दक्षणा दिली पाहिजे. नांव काय बोला; बापाचें नांव काय, आजाचें नांव काय; आईचें, आजोचें, पणजोचें, निदान शेजारीपाजाऱ्याचें नांव—तुमचा कोणना कोणतरी ह्या वहींत अडकून पडलेला असलाच पाहिजे.

तारा०:—आम्ही आयोध्येहून आलों—

रोहि०:—आम्ही आयोध्येहून आलों—

बचं०:—आयोध्येंतील सर्व प्राण्यांचीं नांवें ह्या वहींत आहेत; पुरुष, बायका, गाई, म्हशी, शेळ्या, मेंढ्या, सर्वांचीं नांवें मी टिपून ठेविलीं आहेत; तेव्हां तुमचें नांव असलें पाहिजे; तुमचें नांव सांगा; तें जर नसेल

तर आतांच्या आतां टिपून टाकतों; अगोदर असलें काय किंवा मागाहून लिहिलें काय, माझ्या वहींत नांव पडलें कीं पितर स्वर्गाला गेलेच.

तारा०:—मला तारामती म्हणतात.

रोहि०:—मला रोहिदास म्हणतात; आणि माझ्या वडिलांना हरिश्चंद्र म्हणतात.

बचं०:—वा; हीं नांवें तर राजघराण्यांतलीं आहेत; राजाचें नांव हरिश्चंद्र—

चौवे०:—राणीचें नांव तारामती,

त्रिवे०:—आणि राजपुत्राचें नांव रोहिदास.

चौवे०:—अरे, ह्या भिकाऱ्यांनीं राजाचीं नांवें चोरलेलीं दिसतात !

त्रिवे०:—काय, जवळ कांहीं कपर्दीक आहे, कां नांवावरच आम्हा पंड्यांना झुलविणार ?

बचं०:—अरे, त्यांचे वेष भिकाऱ्यांचे आहेत खरे, पण चेहऱ्यावर गुप्त उबेची तुकतुकी दिसते.

चौवे०:—कोठली आली आहे गुप्त उबबीब; एक दिडकीही जवळ नसेल; चलरे तिवेदी, आपण दुसरीकडे जाऊं; ह्या भिकाऱ्यांच्या तांड्याला कोणाच्या तरी अन्नछत्रांत बचंभटालाच पोचवूं द्या. [जाऊं लागतात.

बचं०:—अरे हे भिकारी नाहींत; गुप्त श्रीमंत आहेत. जाऊं नका; बरें जा, जा. (जातात.) तुम्ही भिकारी आहां असें मला वाटत असतें तर पहिल्या झपाट्यालाच दहावीस शिव्या हांसडून वाटेंतून दूर व्हावयाला तुम्हाला सांगितलें असतें. तारामतीबाई, आतां मला खरोखर सांगा; तुम्ही भिकारी नाहींना ? कांहीं लपवून द्रव्य आणलें असलें तर हळूच माझ्या स्वाधीन करा; तुमची सांगोपांग यात्रा करून बिनबोभाट परत लावून देईन. तुम्ही खरोखर भिकारी असला तर उगीच माझा वेळ घेऊं नका; मला दुसरे यात्रेकरू पच्छाडले पाहिजेत. आहेत कांहीं दहापांच, चारदोन, एक तरी हरिश्चंद्र गांठीं— [हरिश्चंद्र भिकाऱ्याचे वेषांत येतो.

हरि०:—तांब्या पितळेचा किंवा सोन्यारुप्याचा हरिश्चंद्र तिच्या गांठीं नाहीं; पण रक्तमासांचा हा हरिश्चंद्र तिच्याजवळ आहे. बाबारे, आम्ही

खरोखर द्रव्यहीन आहों. त्या झाडाखालीं ठेवलेल्या तीन मोळ्यांशिवाय दुसरें कसलेंही धन आम्हांपाशीं नाहीं. आम्हीं खरोखर कंगाल आहों.

बचं०:—खरोखर कंगाल आहो कंगाल! कंगाल! कंगाल!! ह्या भिकारड्यांना कंगाल म्हणवून घ्यायला शरमही वाटत नाहीं.—कंगाल आहे कंगाल! ए कंगाल, तूं जर भिकारी आहेस तर काशीस आलास कशाला मरायला? आयोध्येस काय भीक मागतां येत नव्हती? जा, आलास तसा परत जा; काशींतील अन्नछत्रांतलि जेवण झोडायला बचंभट, खकंभट, पिलंभट, भिकंभट, त्रिवेदी, चोवेदी, रगड कंगाल काशीस आहेत; आयोध्येच्या भिकाऱ्यांची काशीला जरूर नाहीं. तूं दरिद्री, तर काशीस तुला बोलावलें कोणी? आपली धिंडका येथें कशाला आली? कडोश्रीला छदाम नाहीं तर आलास कशाला?

हरि०:—मी काशीस भीक मागायला, अन्नछत्रांत जेवायला, किंवा सदावर्तें खायला आलों नाहीं. स्वकष्टानें उद्योगधंदा करून स्वकीयांचा चरितार्थ चालविणें व सत्याच्या ऋणांतून मुक्त होणें, हा आम्हा क्षत्रियांचा धर्म आहे.

बचं:—(स्वगत) दगडापेक्षां वीट मऊ; भीक मागणाऱ्या दारिद्र्यापेक्षां उद्योगधंदा करूं पाहणारा कंगाल बरा.

तारा०:—मग आम्हाला काशीची वाट दाखविताना?

बचं०:—बरें ए कंगाल, तूं काशीस धंदा तरी कोणचा करणार?

हरि०:—धंदा पहाण्याकरितां काशीस आलों आहें; सध्या मी मोळीविक्या आहें. आयोध्येहून निघालों तों अन्नाच्या एका कणावरही माझी सत्ता नसल्यामुळें जंगलांतील कंदमूलावर पोट भरून जळाऊ लांकडें गोळा करून त्या कष्टाचे द्रव्यावरच मार्ग चालावा लागला. मार्गांत असतांना प्रसंगानें जो धंदा मला दाखविला त्याच धंद्याचे पेशांत डोक्यांवर ह्या मोळ्यांचा भारा घेऊन काशीविश्वेश्वराचें प्रथम दर्शन मी घेऊं इच्छित आहें. तर कोणच्या रस्त्यानें गेलें असतां मी नेमका काशीविश्वेश्वराचे सन्निध जाईन, हें आपण मला सांगितलें तर काशींतले पहिले मार्गदर्शक आपण मला व्हाल.

बचं०:—पांथस्थानें पांथस्थाला मार्ग दाखवावा, हा पांथस्थांचा धर्म आहे; पण असें करतांना मला माझ्या धंद्याकडे दुर्लक्ष करून सोय नाहीं.—समजलासरे मोळीविक्या, तूं यात्रेकरू असतास तर ह्या तीन मोळ्यांच्या दक्षणेवरही मी तुझी यात्रा सफल केली असती; पण तूं पडलास धंदेवाला!—कसें म्हणतोस मोळीविक्रयकाचा तुझा धंदा—होयना?

हरि०:—होय महाराज, सध्या तर तोच धंदा आहे; आणि असल्या तीन मोळ्या पलिकडच्या जंगलांतून मी रोज काशीस आणूं शकेन.

बचं०:—आहेस तसा धटिंगण आहेस; आणि कामाची तशी संवय झाली—ह्या बाईंना राबायला लावलेंस—ह: ह: मजबूत आहे—अरे हीच तीन तीन चार चार मोळ्यांचा भारा घेईल—शिवाय हा छोकरा—हाडापिंडानें हाही धटिंगण होणार—हें पहा थोडक्या दिवसांत दहाबारा मोळ्यांचा धंदा करण्यांत सहज तरबेज व्हाल.—काय म्हणतां तुम्हाला काशीचा रस्ता दाखवूं होय?

हरि०:—होय महाराज, काशीचा रस्ता दाखवा.

बचं०:—(स्वगत) धटिंगण असून महाराज म्हणतो; बरें आहे सावज. पूर्वी बहुत धनधान्य पोटांत लपवून ठेवून हा लेक धटिंगण झाला आहे; तेंव्हा ह्या कंगालाच्या शरिरांतूनच ते धनाचे कण बाहेर खेंचून काढले पाहिजेत.

तारा०:—मग दाखवितांना काशीचा रस्ता?

बचं०:—हें पहा मोळीविक्या, यात्रेकरूंना गांठण्याबरोबरच मी दलालीचाही धंदा करीत असतों; तेव्हां ह्या मोळ्यांच्या धंद्यांत मला जर योग्य दलाली देशील तर तुझा मी काशींतला पहिला मार्गदर्शक होईन. व्यापारांतला पहिला धडा असा आहे कीं कोणाचेंही कोणचेंही काम फुकट करूं नये.

हरि०:—दलाली दिल्याशिवाय उद्योगधंद्यांत मला तरी बरकत कशी येईल?

बचं०:—काशीविश्वेश्वरासन्निध महास्मशानाला लागून माझ्या गुरूची—चित्रगुप्त ब्राह्मणाची—लांकडाची वखार आहे. चित्रगुप्त माझ्याप्रमाणेंच पूर्वी भिक्षुकी करीत होता; पण पुढें हिशेब टिशेब शिकून कारकून

झाला. पण मालकाची शिंवीगाळ सोसवेना म्हणून त्यानें आतां वखारीचा स्वतंत्र धंदा नुकताच काढला आहे.

**हरि०:**—मी स्वतःला भाग्यवान समजतों; ह्या नव्या वखारवाल्याची व माझ्या नव्या पेशाची एकदम ओळखपाळख होण्याची ही आयती संधि आली!

**बचं०:**—आजकाल काशीस फार पाप माजून पापाचें क्षालन करण्या-करितां मृत्यु घरोघर रात्रंदिवस फिरत असल्यामुळें स्मशानाजवळच्या ह्या चित्रगुप्ताच्या वखारीचा धंदा उसळीसरसा वर आला आहे; तेव्हां मी तुला असल्या भरभराटीच्या ठिकाणीं सोडून देतों. मला दलाली काय देशील, बोल.

**हरि०:**—आपण सांगाल ती दलाली मी आपणास देईन.

**बचं०:**—तुला ढोबळ गणित सांगतों; कारण आंकड्याचा हिशोब मला येत नाहीं आणि येत असला तरी तुला मोळीविक्याला समजणार नाहीं. चित्रगुप्ताच्या वखारींत लाकडें घेतात तीं चबुतऱ्यांवर घेतात. तुझ्यासारख्या पुरुषाला जाळायला पुरेल तो पुरुषचबुतरा, हीला जाळायला पुरेल तो स्त्री-चबुतरा, ह्या पोराला पुरेल तें त्या दोघांचें मूल; तुम्हा तिघांनाही पुरतील इतकीं लांकडें तुम्ही वखारींत टाकलींत, म्हणजे पोराचा चबुतरा मी व चित्रगुप्त दलालीबद्दल उचलणार; मग तुझ्या चबुतऱ्यावर तुमचें पोट भरलेंस तर बायको शिल्लक राहील; बायकोवर पोट भरलेंस तर तुझें धोंद वाढेल. आला हिशोब ध्यानांत? हा कारकुनांचा हिशोब नव्हे मोळीविक्यांचा आखाडा आहे. तूं तुझा धंदा, ही तुझी मिळ-कत; आणि हें पोरटें काय तें दलालाचें तोंडीं लावणें; उगीच कोरड्यास.—आहे कबुल?

**हरि०:**—माझी ना नाहीं.

**बचं०:**—चल, ए बाई चल; चटदिशीं माझ्याबरोबर चल; त्या नावा-ड्याची व तुझी गांठ घालून देतों म्हणजे तो तुला नेमका महास्मशानाचे घाटावर सोडील—मागेंच चित्रगुप्ताची जंगी वखार! कोणाला विचारायलाच नको.—मला त्या पंड्यांना गांठून यात्रेकरूंच्या वासावर फिरलें पाहिजे.

(हरिश्चंद्र, तारामती व रोहिदास जाऊं लागतात.) उचल चटपट पाऊल उचल, राजाच्या राणीसारखी नको चालूं; मोळीविक्याच्या मोलकरणी-सारखी चाल. (तारामती व रोहिदास जातात) ए मोळीविक्या, एक सांगायला विसरलों; चित्रगुप्तानें कोणी पाठविलें म्हणून विचारिलें तर काय सांगशील?

हरि०:—बचंभटानें पाठविलें म्हणून—

बचं०:—तसें नव्हें; व्यापारांत भट म्हटल्यानें पत जाते; आणि पत हें सर्वांत मोठें भांडवल आहे.—बचंभटानें नको; बच्याजी दलालानें असें बोल.—ह्या मोळ्या घेऊन आमच्या वखारींत तुला कोणी पाठविलें?

हरि०:—बच्याजी दलालानें.

बचं०:—आतां ठीक आहे.—(स्वगत) बच्याजी दलाल; बच्याजी दलाल; बच्याजी दलाल! हें माझें नांव ऐकूनच सर्व भिक्षुकांच्या तोंडाला पाणी सुटेल आणि माझ्या पुढें लाळ घोटायला लागतील.—बच्याजी दलाल, बच्याजी दलाल! [जातो.

हरि०:—(स्वगत) प्रवासांत अंगीकारलेला धंदा माझ्या मागें नित्याचा लागतो कीं काय? मोळीविक्या होऊन विश्वामित्रांच्या हजार मोहरा मी कशा देणार? माझी धनुर्विद्या काशीखंडांत कवडीमोलाची ठरते कीं काय? खड्ग चालविण्यांत दाखविण्याची मनगटाची शक्ति लांकडें फोडण्यांत खर्च होणार काय? धनुष्याला बाण लावण्यांत दिसणारें हस्तलाघव स्मशा-नांत सर्पणाचे चबुतरे रचण्यांत दाखवूं काय? प्रबल वीरांवर करावयाचे आघात शुष्क लांकडांना सोसावयाला लावून मातेला वीरमाता म्हणवूं काय? वीरांनीं जग गजबजलेलें नसून ह्या वाळलेल्या लांकडाप्रमाणें रूक्ष असलेल्या पोटभरूंनीं ही पृथ्वी भरलेली आहे, हा माझा प्रवासांतील अनुभव काशीखंडांत काशीविश्वेश्वरा, खोटा ठरीव, अशी काशींत प्रवेश करण्याच्या वेळचीं तुझ्या पायापाशीं माझी प्रार्थना आहे. [पडदा पडतो.

---

# अंक दुसरा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ**—चित्रगुप्ताची वखारं.

[दोन मोलकरणी प्रवेश करितात.]

**पहि०:**—तुझे चबुतरे लावून झाले काय?

**दुस०:**—ती तारा चबुतरे मांडायला शिकत आहेना? ती मला म्हणाली तू आज स्वस्थ बैस, मीच तुझें काम करितें.

**पहि०:**—माझें सुद्धां काम तीच करणार आहे. तिला शिकायचें आहेना!—खरेंच गडे ही जर रोज वर्षानुवर्ष शिकत राहिली तर गुरूजी-प्रमाणें तक्याशीं टेकून बसून मजूरी आम्हांला मिळेल.

**दुस०:**—अग ती म्हणे राजाची राणी आहे!

**पहि०:**—मग तिला एक वर्षांत कसल्या मोळ्या वाहायला येणार; आम्ही जन्मभर मोळ्या वाहिल्या तेव्हां आतां कुठें त्यांतलें कसब समजलें.

**दुस०:**—अग तिला वखारींतली झाडलोट नीट करतां येत नाहीं; ह्या जन्मीं कोठले चबुतरे लावायला येणार?

**पहि०:**—राजाची राणी असेल तर तिला हार गुंफतां येत असतील; गाणी म्हणतां येत असतील—

**दुस०:**—नाहीं तर नट्टापट्टा करतां येत असेल; पण बाभळीचें कोणचें लांकूड, लिंबाचें कोणचें, आंब्याचें कोणचें, ओलें कोणचें, वाळलें कोणचें— [तारा व अन्नपूर्णा प्रवेश करितात.

**अन्न०:**—मी कितींदा सांगितलें ह्या राजाच्या राणीला माझ्या स्वयंपाक-घरांत कामाला पाठवूं नका. हीला धड जाळ समजत नाहीं, आधण माहीत नाहीं, भाजलें कीं कच्चें तें ओळखतां येत नाहीं; ढलप्या आण

म्हटलें कीं शेणी आणती, काय करायचें असलें हें अरिष्ट हाताखालीं घेऊन?

तारा०:—अन्नपूर्णाबाई, आपण सांगाल तसें मी कामकाज करीन; आपण गुरू व मी शिष्यीण; आपणापाशीं शिकायला आलेना?

अन्न०:—कसली शिकतीस? माणसाला कांहीं मूळचें पाहिजे? तारफेण्यांना थोडी मंद आंच दे म्हणाले; ह्या मेलीनें आपला भडाग्नी सुरू केला! सगळ्या तारफेण्या करपून गेल्या. मेले, गाणीं म्हणायला लागलीस म्हणजे जसे गोड गोड लाडके लडाके सूर काढतीस तसेंच स्वयंपाकांत आहे हो; आग्नीच्या ज्वाळेची ताण गोलचीदार वर जाऊन पटदिशीं परतावी लागते, तरच पदार्थ मधूर होतात.—काशींतले सगळे श्रीमंत माझ्या अन्नपूर्णा गृहांत यायला धडपडतात, तें उगीच नाहीं. आतां ते खादीला आले म्हणजे त्यांना गाणीं का वाढूं?

तारा०:—हें पहा मला असल्या कामाची सवय नाहीं, त्यामुळें अचुकतें.

अन्न०:—जरा लक्ष ठेवलें म्हणजे चुकायचें नाहीं.—लक्ष सगळें त्या मेल्या हरिश्चंद्राकडे; कामाकडे लक्ष आहे कोठें? अधणाचे भांडें चुलीवरून उतरायला गेली आणि मसणीनें सगळें अधण माझ्या पायावर सांडलें; माझ्या पायाची गुरवळी झाली; दोन दिवस झाले, ह्या अवदसेचे हात मऊ त्यामुळें माझे पाय फुगून चालवत देखील नाहीं.—मेले, तूं उद्या भाकऱ्या कशा भाजणार? करपलेल्या भाकरीचे कोळसे भरून नवऱ्याच्या पोटाचा उकिरडा का करणार तूं? [ चित्रगुप्त येतो.

चित्र०:—किती आरडा ओरड ही! माझी वखार म्हणजे काय बाजार आहे? केवढ्या मोठ्यांदा बोलता—मी तुला काल सांगितलें ना कीं लांकडाच्या वखारीची पेढी केली आहे.—पेढींत अगदीं हळूं बोललें पाहिजे; कानाकानांत कुजबुजलें पाहिजे;आणि पदराच्या आंत हातांत हात घालून खुणा खुणांनीं एकमेकांना संकेत कळविला पाहिजे. व्यापारांत वरच्या पायरीला चढलें म्हणजे नुसत्या खुणांनीं काम चालतें. मोक्षावर आरूढ झालेल्याला मोक्षाचें ज्ञान सद्गुरू जसा नुसत्या खुणांनीं कळवितो त्या प्रमाणें आम्ही पेढीवाले सोन्यामोत्यांच्या किमती नुसत्या खुणांनीं कळवितो.—चूप, फाजील बोलूं

नकोस ? माझ्या हातांत हात दे, खुणांनीं कळीव तुझ्या तक्रारी काय आहेत त्या.

अन्न०:—एहेरे पेढीवाले.—कारकुन होता त्यावेळीं माझें आणि मुलाचें पोट भरवेना! मेलें मी अन्नपूर्णागृह सुरूं केलें—तूं कारकुनाची बायको तुझा दर्जा मोठा, उपाशी मर पण बाहेर भ्रमाचा भोपळा फोडूं नको—कितींदा सांगितलेंत ?

चित्र०:—सांगितलें, सांगितलें. पण तूं कुठें एकलेंस ? दुकान घातलेंसना फराळाचें. तुझ्या अन्नपूर्णागृहांतील पक्वानांनीं सगळ्या काशीला वेड लावलेस; आणि गणप्याला—

अन्न०:—सोन्यासारखा मुलगा; स्वतःच्याच मुलाला जर तुम्ही गण्या, गणप्या,म्हणूं लागलां तर लोक त्याला कसे मानतील ? कारकुन होता त्या वेळीं म्हटलें रावसाहेब, नानासाहेब कांहीं तरी मोठ्या नांवानें चिरंजिवाला हाक माराल—

चित्र०:—अग मला जर सुवर्णदासी कारकुंड्या कारकुंड्या म्हणूं लागली तर मी तरी मुलाला गण्या गणप्या म्हणून अपशब्दांची लाट पुढच्या पिढीपर्यंत कां ढकलूं नये ?

अन्न०:—आतां तर तुम्ही पेढीवाले झाला ना ?

पहि०:—मग आम्ही सगळ्याजणी म्हणतों त्या प्रमाणें गणपतशेटजी कां म्हणूं नये ?

दुस०:—गणपत शेटजी म्हणजे गणपतीचा अवतार ? घोटा वाटून वाटून पोट वढेलसें वाटलें होतें, पण तेंही नाहीं; हें झालें तरी त्यांतल्या त्यांत मोठ्या नावाला साजेसेंच झालें !

अन्न०:—माझ्या हातचें फराळाचें व गंपुच्या हातची थंडाई ! काशीस कोठें तरी अशी सोय आहे का ? ह्या तारेला मी म्हणतें तूं पक्वानें करायला शीक, रोहिदास थंडाई छानूंदे, हरिश्चंद्र आज लाकडें फोडतोच आहे हळूं हळूं त्याची स्वतःची वखार होईल, आणि तुझें फराळाचें व घोट्याचें दुकान थाटलें म्हणजे हरिश्चंद्र हां हां म्हणतां पेढीवाला होईल. पण मेलीला अजून भांडे चुलीवर चढवितां येईना व उतरतां येईना !

चित्र०:—आणि हरिश्चंद्र पेढीवाला व्हावयाला माझ्या सारखा हिशेब

कुठें त्याला येतो आहे? अग राजा असतांना माणसें फोडण्याची कला शिकला, म्हणून थोड्या वेळांत त्याला झाडें मारण्याची विद्या साधली! राजा आणि लुटारू हे जसे सावत्रबंधु, त्या प्रमाणें राजा आणि लांकूडफोड्या हेही सगोत्रच असतात. खड्गाची कुऱ्हाड होते, पण बोरू नाहीं होत.— दर्भाचा बोरू होतो!—हीं नातीं अशी आहेत.—तारे, तुझा नवरा माझ्याप्रमाणें पेढीवाला व्हावा असें तुला वाटतें का?

**तारा०:**—मला तें घोटा ओतायचें आणि भजी तळायचें काम नको; लांकडें फोडीत असतांना त्यांच्या शेजारी उभी राहून मीं आपली लांकडाचे चबुतरेच रचतें.

**चित्र०:**—जाग जा; हिला चबुतरेच रचायला घेऊन जा. (मोलकरणी व तारा जातात.) भजी तळायची, घोटा छानायचा, आणि खरकटीं भांडीं घासण्याप्रमाणें वही खरडायची, हे बिकट धंदे आम्ही ब्राह्मणांनींच बिनबोभाट करावेत. [ बचंभट येतो.

**बचं०:**—माझ्या दलालीचा हिशेब मला, शेटजी, सांगून चुकताही करा. म्हणजे आपल्या नांवाचा हा बडा शिक्का आपल्या पेटीवर—पेढीवर— ठोकून देतों. [नांवाचा शिक्का दाखवितो.

**अन्न०:**—इश्श, इकडचें नांव न लिहितां दुसऱ्या कोणाचें नांव का म्हणून ह्या शिक्यावर?—दलाली इकडून घ्यायची आणि शिक्का दुसऱ्याच्या नांवाचा, हें नवें कसब शिकलास बचंभट.

**बचं०:**—हं बचंभट नव्हे; मला बच्याजी दलाल म्हणतात; हालहाल करून गिऱ्हाइकाला नाडवावें लागतें तेव्हां दलाल होतो; म्हणून कोणाही दलालाला भटाच्या नेभळट नांवानें हांक मारतां कामा नये.

**अन्न०:**—बरें, बच्याजी दलाल, हा शिक्का कोणाच्या नांवाचा तयार केला आहे?

**बचं०:**—चित्रदास गुप्तदास पेढीवाले, यांच्या नांवाचा.—दत्तक गेलें म्हणजे जसें नांव बदलतें, त्या प्रमाणें धंदा बदलला म्हणजे नांवालाही ठिकठिकाणीं नवी मुरड घालणें भाग पडते.—चित्रदास गुप्तदास पेढेवाले— नवे—पेढीवाले! [ शिक्का पेटीवर लावतो.

**चित्र०:**—पेढेवाले–गोड नांव–गोड–पेढीवाले–प्रतिष्टित–अधिक प्रतिष्टित–पेढीवाले! पेढीवाले! चित्रदास गुप्तदास पेढीवाले.–आतां मी खराखुरा पेढीवाला झालों.

[पडद्यांत–" चिगुत्रप्त कारकुन आहे का कारकुन "]

**बचं०:**—येथें चित्रगुप्त कारकुन कोणी नाहीं. ही चित्रदास गुप्तदास पेढीवाल्यांची वखार आहे; चित्रदास गुप्तदास पेढीवाल्यांची वखार आहे.

[पडद्यांत–" चित्रगुप्त आहे का चित्रगुप्त "]

**चित्र०:**—ही विश्वामित्राची स्वारी दिसते!—जा तूं. एखादे वेळेला हरिश्चंद्राऐवजीं मला, तारामतीच्या जागीं तुला, आणि रोहिदासाकरितां आपल्या गणपुलाच शाप द्यायचा! विश्वामित्राचे दयेला जसा सूर नाहीं त्याप्रमाणें ह्याचे शापालाही ताल नाहीं.–आहे महाराज चित्रगुप्त आहे.—जा, तूं जा. [अन्नपूर्णा जाते. विश्वामित्र येतो.

**विश्वा०:**—चित्रगुप्ता, हाक मारली तर ओ देखील चटदिशीं देववत नाहीं का? हरिश्चंद्राच्या नांवलौकिकामुळें वखार चांगली चालली म्हणून माजलास वाटतें?

**चित्र०:**—कोणाचाही माज शापून दग्ध करण्याचें सामर्थ्य काशींत मूर्तिमंत वावरत असतांना मजसारखा गरीब कसा माजेल?.—जुनें चित्रगुप्त नांव लोपलें असून नवें चित्रदास गुप्तदास—

**बचं०:**—चित्रदास गुप्तदास पेढीवाले—

**चित्र०:**—पेढीवाले हें नवें नांव हरिश्चंद्राचे प्रभावानें—

**विश्वा०:**—हरिश्चंद्राचे प्रभावानें! हरिश्चंद्राचा कसला त्यांत प्रभाव?

**चित्र०:**—हरिश्चंद्राच्या सत्याचरणाचा बाणा सर्व काशीला माहीत असल्यामुळें गोरगरिब बायाबापड्या सगळ्यांना वाटतें ह्या पेढींत पैसे नेऊन ठेवले तर लबाडी कांहीं व्हावयाची नाहीं; हरिश्चंद्राच्या अंगच्या सत्याचा लोहचुंबक सर्वांच्या खिशांतले पैसे माझ्या पेढीकडे ओढत असतो.

**बचं०:**—शिवाय वखारीचाही धंदा चांगला चालला आहे. म्हातारा झालेला प्रत्येक इसम धडपड करून काशींतल्या महास्मशानांत जळायला येतांना तिरडीवरून ओरडत असतो, हरिश्चंद्राच्या हातांनीं फोडलेल्या लांक-

डांनीं मला जाळा, हरिश्चंद्राच्या हातांनीं फोडलेल्या लांकडांनीं मला जाळा! वतनदार डोंबांच्या वखारी ओस पडल्या. चंदनाच्या भावानें ह्या वखारींतली बाभळ आजकाल विकली जाते.—सत्याच्या स्पर्शाचा सुवास चंदनाहून अधिक असतो काय?

विश्वा०:—चंदनाचा सुवास अल्पकाळ टिकतो, आणि सत्याचा सुगंध तिन्ही काळांना व्यापून जशाचातसा उरतो.—मग काय चित्रगुप्ता, तुझी पेढी मोहरांनीं अगदीं भरली असेल!

चित्र०:—हो; माझ्या वखारींतलीं लांकडे म्हणजे सोनें आहे.

विश्वा०:—हरिश्चंद्रामुळें तुला ही श्रीमंती प्राप्त झाली आहे—

चित्र०:—नाहीं म्हणायला मी थोडाच कृतघ्न आहें; कोणालाही खाल्ल्याबरोबर ‘ सुखीभव ’ असा आशिर्वाद देऊन आम्ही कृतज्ञ ब्राम्हण मोकळे होतों.

बचं०:—आणि मग कोणाचें कांहीं देणें आम्ही लागत नाहीं.

विश्वा०:—हरिश्चंद्रावर तूं कांहीं उपकार कर म्हणून तुला सांगायला मी आलों नाहीं; माझें इतकेंच म्हणणें आहे, हरिश्चंद्राची कांहीं बाकी तुझ्याकडे निघत असली (हरिश्चंद्र येतो.) कायरे, हरिश्चंद्रा, पहिल्या हप्त्याच्या पांचशे मोहरा तूं आतां एक महिन्यानीं द्यावयाच्या आहेत ना?

हरि०:—आणि त्याचकरितां, महाराज, आज पांच महिने लांकडे फोडून हाडाचीं काडें केलीं आहेत!

विश्वा०:—मग तुझ्या धन्याला सांग, काय तुझी बाकी असेल ती माझ्या पदरांत टाकायला. मी आज तगाद्याला आलों, याचें कारण इतकेंच पांच महिन्यांत पोट भरण्यापलीकडे एक कवडीही जर तुला मिळवितां आली नसली, तर उद्योगधंद्याचा नाद सोडून दुसऱ्या कोणच्या तरी मार्गाला तुला उद्यांपासून लागलें पाहिजे.

हरि०:—उद्योगधंद्याशिवाय द्रव्यार्जनाचा दुसरा मार्ग कोणचाच नाहीं.

विश्वा०:—नसायला काय झालें? भीक मागून द्रव्य मिळतें; ह्या क्षेत्रस्थानांतील मोठ्यामोठ्या हवेल्यांकडे व मठांकडे पहा; पुजारी, सेवेकरी व महंत, राजालाही लाजविणाऱ्या चैनींत किती गुरुफटले आहेत, याचा

विचार कर; राजराजेश्वराच्या पदरीं जेवढें सैन्य असतें त्याहून अधिक मोठा भक्तांचा जमाव ह्यांच्या चरणीं लोटांगणें कशीं घालत असतो, हें ध्यानांत आण; म्हणजे भीकेच्या रोजगारांत किती किफायत आहे, हें तुला समजेल. राजा, दया भीकेचा आत्मा आहे. दयेच्या भांडवलावर भीकेचा कारखाना काढ, भीक माग व भीक घाल; म्हणजे तूं कोट्याधीश हां हां म्हणतां होशील. दया झाली तरी परमेश्वरी गुण आहे व त्या गुणासभोंवती लक्ष्मीनें घिरट्या घालीत रहावें, हें साहजीक नाहीं काय?

हरि०:—परमेश्वरी उलाढाल दयेंत विराम पावते, हें मला मान्य आहे; पण द्रव्यार्जन हें दयेचें काम नव्हे. लढाईंत घायाळ होऊन हांथरुणावर पडलेल्यांची जखम भरून काढण्याकरितां मलमाची पट्टी असते; मलमाची पट्टी म्हणजे आम्हा वीरांच्या भात्यांतील बाण नव्हे, हातांतील धनुष्य नव्हे, मनगटांतील शक्ति नव्हे, किंवा हृदयांतील शौर्य नव्हे. परमेश्वरी शक्तीचें अनुकरण करणें, हें आम्हा वीरांचें शील आहे; दुसऱ्यावर दया करण्यांत वीरांना सुख वाटतें; पण दुसऱ्याच्या दयेची अपेक्षा करणारा जसा ईश्वर नव्हे त्या प्रमाणें भीक मागणाराही राजा नव्हे. ईश्वर दया करतो, दया मागत नाहीं; वीर पुरुष भीक घालतो, भीक मागत नाहीं.

विश्वा०:—तूं भीक माग किंवा नको मागूं; मला त्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं; पण भीक मागण्याचाच जर प्रसंग आला तर माझ्या दारांत प्रथम यायला विसरूं नकोस.—चित्रगुप्ता, हरिश्चंद्राची पांच महिन्यांची काय शिल्लक आहे?

चित्र०:—महाराज, पांच प्राणांना एक वेळ पांच घास पुरतील एवढी देखील हरिश्चंद्राची पांच महिन्यांची शिल्लक नाहीं.—आपण माझ्या पेढीच्या वह्या तपासून पहाव्यात मीं ढलपीनढलपीचा हिशेब ठेवला आहे.

बचं०:—आतां, हरिश्चंद्रानें फोडलेलें लांकूड म्हणजे सोनें असें जर आपण मानीत असाल तर पांचशें मोहरांच्या मारोभार ढलप्या आपल्या धुमीकडे पाठविण्यास हरकत—

चित्र०:—तितक्या ढलप्यांचीही शिल्लक निघेलसें वाटत नाहीं; कारण हिशेबच करायला निघालों तर तारामतीनें अन्नपूर्णागृहांत केलेली नासधूस,

रोहिदासानें लाकडें फोडण्याची विद्या शिकतांना कुऱ्हाडीच्या धारेची झालेली झीज, वगैरे सर्व बाबी पुढें येतील; हरिश्चंद्रानें माझें उलट देणें निघेल.

**विश्वा०:**—हरिश्चंद्रा, महिन्यानें माझ्या पांचशें मोहरा कशा देणार? बोल.

**हरि०:**—माझीं हाडें अजून ताठ उभीं आहेत; शरीर वेंचून आपलें देणें देईन.

**विश्वा०:**—तीच गोष्ट सांगण्याकरितां मी आज तुला भेटायला आलों आहें. तुला जर शरीर विकावयाचें असेल तर तें उद्यांच विकलें पाहिजे; कारण येथील गुलामांच्या चौकाचा असा नियम आहे कीं, एक महिनाभर गुलामाला वापरून मग पैसे देण्यांत येतात. तूं उद्यां जेव्हां स्वतःचें शरीर विकशील तेव्हां एक महिन्यानें मला पैसे मिळतील. पाहिजे तर गुलामगिरी पतकर, पाहिजे तर जुवा खेळ, पाहिजे तर चोरी कर, पाहिजे तर भीक माग; तूं कसे पैसे मिळविणार याच्याशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं. माझ्या पांचशें मोहरा मला मुदतींत मिळाल्या पाहिजेत. भीकच मागायला लागलास तर मात्र मी सूटेची भीक घालीन इतकेंच.

**चित्र०:**—मी नेहमीं याला सांगतों भीकेशिवाय—हात पसरल्याशिवाय—ब्रह्मादिकांचेंही चालत नाहीं; मग तुलाच एवढी ऐट कशाला? मी आतां पेढीवाला झालों आहेंना, पण प्रारंभीं मधुकरीच होतों. माझ्या पेढींतिल ठेवी मधुकरीच्या चौपदरींत गुंडाळून ठेवलेल्या असतात; अरे भीक ही कामधेनु आहे कामधेनु!

**बचं०:**—गंगेला स्नानाला जातांना चार घरें कोरान्न मागावें, दोन प्रहरीं सदावर्तांत पुख्खा झोडावा, संध्याकाळीं देवदर्शनाला जातां येतां तेल मागावें; एक धांव, दोन काज! ह्या सव्यसाची गुणांत मी याला केव्हांच तरबेज केला असता; रोख दक्षणा येईल तेवढीच काय ती दलाली मागत होतों. पण नशिबीं नाहीं, त्याला आम्ही काय करणार?

**विश्वा०:**—हरिश्चंद्रा, तुला कोण विकत घेत असला तर त्याचा तलास कर, आणि उद्यांचे उद्यां मला एक महिन्याचा हवाला पटीव. मी उद्यां गुलामांचे चौकांत तुझी वाट पाहीन. नशीबाची व उद्योगाची परीक्षा पहा-

वयाची असली तर खुशाल एक महिना वाट पहा; पण महिन्याचे अखेरीस शरीरविक्रीचा मार्ग बंद होऊन माझ्यापुढें हात तरी पसरावे लागतील किंवा शरीराबरोबर प्राणही वेंचून रौरव नरकाचा मार्ग स्वीकारावा लागेल. उद्यां जर गुलामांच्या चौकांत तूं दृष्टीस पडला नाहींस तर सत्यभ्रष्ट झालेला हरिश्चंद्र पाहण्याकरितां हिमालयांतून निघून काशीस या म्हणून वसिष्ठाला मी निरोप पाठवीन. गेले पांच महिने तूं लांकडें फोडून हाडाचीं काडें केलीस खरी, पण हाडें मऊ केल्याशिवाय भागत नाहीं, हें हा सहावा महिना तुला शिकविणार आहे. अरे, हें कालचक्र तुझ्या हाडाचीं काडें—नव्हे—चूर्ण करूनच थांबणार नाहीं, तर त्यांचें लवलवीत मेण बनवील; आणि मग त्याच्यावर मजसारख्या तपस्व्यांच्याच तेवढ्या दयेचा छाप उमटेल असें नाहीं तर ज्या ज्या अधमांचे हात त्या मेणावर पडतील त्या त्या अधमांच्या पापाची मूर्ती तुझ्या हाडांनीं बनावें लागेल. कालचक्राचे दोन चार दांतेच आतांपर्यंत फिरले आहेत; वेळींच सावध होऊन, कालचक्राला थांबविण्याची किंवा निराळीच गति देण्याची हांव न धरतां, त्याला नमस्कार करून बगल देऊन मोकळा हो. काय होतोस का अशा रीतीनें मुक्त ?

हरि०:—उद्यां गुलामांचे चौकांत आपलें दर्शन घेईन.

विश्वा०.—अजून हाडें मऊ झालीं नाहींत. गुलामांच्या चौकाचें यंत्रच तें काम करील. [ जातो.

वचं०:—हरिश्चंद्रा, तुला जर स्वतःला विकून घ्यावयाचें असलें तर माझ्याशिवाय दुसरा दलाल पाहूं नको.

चित्र०:—आणि विक्री करणार माझी पेढी; चित्रदास गुप्तदास यांचे मार्फतच ही विक्री झाली पाहिजे. इतक्या दिवस तुझ्या पोटापाण्याची सोय माझ्या वखारीनें लावली, दोन पैसे मिळायच्या सवड्याचे वेळीं मात्र दुसरी पेढी पाहूं नकोस; पुढें पाऊल टाकतांना मनुष्यानें नेहमीं मागें वळून पहात असावें.

वचं:०—गुलामांच्या चौकांतली तुला दुसरी एक खुबी सांगतो, तारामतीला जर विकलीस—प्राणासकट जर विकलीस—विकत घेणाऱ्याला तिचा प्राणनाथ होतां आलें पाहिजे—नुसती मोलकरीण म्हणून विकण्यापेक्षां

प्राणासकट विकल्यानें कर्जातून एकदम मुक्त होशील.—आणि त्यांतली मजा अशी तुम्हा-आम्हा सगळ्यांना जन्मभर दारिद्र्याचा बागुलबुवाच शिल्लक राहणार नाहीं.—काय, करतोस हिय्या? बांधतोस कंबर? दे ठोकून हा सवदा, आणि टाक टिचून विश्वामित्राचे नाकावर हजार मोहरा एकदम!

हरि०:—गेल्या पांच महिन्यांत माझ्या मोळ्यांची विक्री चांगली झाली, असें आपण वरचेवर म्हणत होतां, आणि शिल्लक—

चित्र०:—अरे, तें तुला उत्तेजन मिळावें म्हणून. हिशेब म्हणजे शुद्ध आंकडे! त्यांत उत्तेजन नाहीं, वशिला नाहीं, दया-माया नाहीं, रस नाहीं. निर्विकार परब्रह्माच्या हातांतील निष्ठुर कांटा म्हणजे हिशेबाचा आंकडा! एवढेंही तुला समजूं नये!—दिवसभर सूर्य राबतो,—तूं लांकडें फोडतांना पाणी प्यायला तरी बसतोस, भाकर खायला तरी घटकाभर थांबतोस, पण बिचारा सूर्य सबंध दिवसभर मर मर मरतो,—आणि संध्याकाळीं हिशेबाचे वेळीं 'शिल्लक कांहीं नाहीं' म्हणण्याबरोबर गोरेंमोरें तोंड करून पश्चिमसमुद्रांत जीव देतो. भीक न मागणारांची नेहमीं हीच गत होते.

हरि०:—या देहाची विक्री किती मोहरांना होईलसें तुम्हाला वाटतें.

बचं०:—त्याचा कांहीं नेम नाहीं, तें गिऱ्हाइकांवर अवलंबून आहे. राजाची राणी माझी दासी आहे, असला षोक करणारा हजार दोन हजार मोहरा तारामतीला सहज देऊन जाईल; हौसेला मोल नाहीं.—चला, शेटजी चला, आतां आपण रत्नपालाचे पेढीवर जाऊं आणि सराफकट्ट्यावर जाहीर करूं, उद्यां गुलामांचे चौकांत राजा-राणी विकली जाणार आहेत.

चित्र०:—हरिश्चंद्रा, उद्यां कोणाला प्रथम विकावयाचें याचा तूं नीट विचार कर; विक्रीच्या मालाचा गवगवा मी आतां जाऊन सर्व शहरभर करतों. श्रीमंतांना पान्हा फुटल्याशिवाय गुलामांची किंमत चढत नाहीं. चला बचयाजी दलाल, मालाची किंमत चढविणाऱ्या सर्व युक्त्या आतां लढवा.

बचं०:—हो! हो! लागूंयाच त्या उद्योगाला. प्रहरा दोन प्रहरांत हरिश्चंद्राच्या शक्तीची व तारामतीच्या लावण्याची चोहोंकडे बोंबाबोंब करून देतों.

चित्र०:—वळवाच्या पावसाच्या मुसळधारेप्रमाणें एखाद्याच्या स्तुतीचा

किंवा निंदेचा वर्षाव तुझी जीभ करीत असते, आणि त्यामुळें चातकाप्रमाणें तुझ्या रसाळ जिभेकडे कांहींचें लक्ष लागून राहते,—

बचं०:—आणि पायाळूप्रमाणें माझ्या वीजेनें कांहीं भयाभीत होतात.

[बचंभट व चित्रगुप्त जातात.

हरि०:—(स्वगत) मी स्वतःला विकायला केव्हां काढतों, म्हणून टपून बसल्यासारखेच हे दिसतात! नोकराची विक्री व्हावी, प्राणासकट तो जाळ्यांत सांपडावा, त्याचें कर्तृत्व यांच्या कार्याला सतत जुंपलें जावें, अशी पेढीवाल्यांची नीति बेशरमपणानें ज्या शहरांत वावरत असते, तेथें स्वतःच्या अंगच्या शक्तीनें, गुणानें व उद्योगानें कोण उदयाला येणार? पराक्रमी सूर्याचें तेज गिळंकृत करून, सूर्याचेच जागीं चांदण्यांचा नाच करण्यांत रात्र घालवून, सकाळीं बालसूर्याला गंभीरपणानें कुरवाळणाऱ्या आकाशाप्रमाणें हे काशीनगरीचे वतनदार व प्रतिष्ठित चोर दुसऱ्याचे गुणांवर स्वतःचें धोंद वाढवून पुन्हां क्षात्रतेजाचे व बुद्धिवैभवाचे पोशिंदे म्हणून मिरविणारसें दिसतें! सांठविलेल्या पैशाच्या नादानें यांच्या आवारांत जोंपर्यंत चांदण्या वावरत आहेत, क्षयी व व्यभिचारी चंद्राचें बायकी काव्य यांच्या काळोखीवर जोंपर्यंत सफेती फासण्याकरितां चांदण्यांच्या लोभानें फुलतें आहे, तोंपर्यंत सर्व विश्वाला ग्रासून टाकण्याइतकें यांचें अंगण विस्तीर्ण हें दाखविण्यापलीकडे दिवसाच्या उजेडाचा उपयोग दुसरा कोणचा होणार? दिवस उगवला कीं लोक डोळेझांक करितात, आणि रात्र आली कीं जागे होतात; असली विपरीत स्थिति दयेच्या ओलाव्यानें कसची सुधारणार? कठोर सत्याच्या तीक्ष्ण अंजनाशिवाय कोण शुद्धीवर येणार? हें अंजन बनविण्याकरितां राजांनीं आपल्या हाडांचे कोळसे नको का करायला? त्या कोळशांची पूड करून स्वतःच्या बुद्धीच्या तेलांत ती खलून लोकांच्या डोळ्यांत घालण्याचें काम विश्वामित्रा, तुझ्यासारख्या ऋषींनीं नको का करायला? स्वतःचीं हाडें विकायलाच काय पण सत्याचे अग्नींत त्यांना जाळून त्यांचें अंजन बनवायला हा हरिश्चंद्र तयार आहे. माझ्या हाडांचे कोळसे होत असतांना त्या तेजामुळें जर विश्वामित्रासारख्यांच्या बुद्धीला अंधारांत झोंपीं जातां आलें नाहीं, तर लांकडें फोड-

णाऱ्या हाडांपेक्षां जळणारीं हाडें सर्व विश्वाला व त्यामुळें मलाही अधिक सुखी नाहीं का करणार? [जातो.

---

## प्रवेश दुसरा.

स्थळ—रस्ता.

[ गंपुशेट व अन्नपूर्णा येतात. ]

अन्न०:—चलरे बाळ, लवकर पाय उचल. आतांशा तुझें पोट फार मोठें झाल्यासारखें दिसतें.—भांग जरा कमी घ्यावी.—असें गर्भारशीसारखें चालूं नये.

गंपु०:—आई, तूं माझें लग्न करून देत नाहींस कांहीं नाहींस; मग मी तरी काय करूं? घोटा घेतों सपाटून, त्यानें पोट वाढलें आहे.—तूं कां इतकें वाईट वाटून घेतेस? सून नाहीं तर मुलगा कोणी तरी गर्भारशी-सारखें चाललें म्हणजे झालें.

अन्न०:—आतां होईल हो लग्न! तिकडून पेढी काढायचें झालें, आतां एका वर्षांत लग्न होईल. हा चतुर्मास संपतो ना संपतो तों पहिलें दिवाळें निघेल, पण तुला मुलींना काय कमी? पहिलें दिवाळें निघालें म्हणजे मीं गोटतोडे करणार आहें,—दुसऱ्या दिवाळ्याला पेट्या—तिसरें दिवाळें निघालें कीं, तुझें लग्न करून टाकूं.

गंपु०:—कोठचें लग्न व्हावयाला! तिसरें दिवाळें निघालें कीं, बाबाच आपली तिसरी वरात काढतील! शिवाय मला त्या परकऱ्या मुलीच नकोत; मी आजच्या लिलावांत तारामतीला विकत घेतों; म्हणजे आयतीं दोनतीन मुलें बाबा बाबा म्हणून माझ्या मागें लागतील.—आई, मी आजचे आज बाप होतों.

अन्न०:—तुलारे कोण तारामतीला घेऊन देणार? वखारींत तारामतीला ते ठेवणार आहेत.

गंपु०:—हें काय ग आई, बाबांचा जिथें तिथें आपलपोटेपणा? श्राद्ध-पक्ष आपणच करितात, एवढा मी मोठा झालों तरी मला एक वर्षदेखील श्राद्ध करूं दिलें नाहीं; लोक मला मुली कशा देतील? श्राद्धपक्षाचें राहूं दे, परवा मेहुतराचें आमंत्रण आलें होतें, मी म्हटलें तुमच्या जागीं मी पाना-वर बसतों, साफ नाहीं म्हणून सांगितलें त्यांनीं! बाबा कारकून होते, त्या वेळीं लोक त्यांना भारवाहक म्हणत—मूर्ख म्हणत—गर्दभ म्हणत—पण मी म्हणतों बाबा पेढीवाले झाले तरी अजून जसेच्या तसेच आहेत.

अन्न०:—हो अजून आहेत तसेच मूर्ख—गाढव आहेत.—कारकुनींत सगळा जन्म गेला, आतां ह्या वयांत किती धुतलें—किती कान कापले—तरी थोडेंच घोड्याचें रूप येणार आहे.—आपलींच माणसें आपण असें रस्त्यांत बोलूं नये झालें.—चल उचल लवकर पाय गंपू; त्यांनीं गाढवा-एवढी चूक करून ठेवली आहे; लिलावाच्या अगोदर दोन घटका आम्हाला पोंचलें पाहिजे म्हणजे कांहीं तरी दुरुस्ती होईल.

गंपु०:—हा मी लागलोंच हालायला.—बाबांनीं आणि बच्याजीनें हरिश्चंद्राची व तारामतीची स्तुति काय चालविली आहे!

अन्न०:—अरे तीच चूक होते आहे म्हणतें ना मी—मी त्यांना उगीच नाहीं भारवाहक म्हणत—आपण जर स्तुति केली तर त्यांची किंमत नाहीं का वाढायची; मग हरिश्चंद्र व तारामती आम्हांला कसे विकत घेतां येतील?

गंपु०:—खरे पेढीवाले नव्हत; कारकुनीचें रक्त, भारवाहकच!

अन्न०:—आतां तूं तारामतीची निंदा कर, मी हरिश्चंद्राची निंदा भरबाजारांत करितें.

गंपु०:—तसें नको आई; मी हरिश्चंद्राची निंदा करितों; कारण तारामतीची निंदा म्हणून करायला लागीन, आणि तिचा चेहरा डोळ्यां-पुढें आला म्हणजे जीभ स्तुतिच ओकूं लागेल!

अन्न०:—बरें बरें तसें करूं या. उचल पाय झटपट.

गंपु०:—ह्या गोळ्याला एकदा गति दिली, कीं त्याला थांबविण्याची शक्ति कोणाला आहे; हा लागलों धांवायला. [जातात.

---

## प्रवेश तिसरा.

स्थळः—गंगाकिनारा

[तारामती प्रवेश करिते.]

तारा०:—मी एकटी मागें राहून काय करूं? रोहिदासाचें लालन-पोषण करून सूर्यवंशाचा दीप पुन्हां दैदिप्यमान कर, असें म्हणणें झालें; पण तिन्ही लोकांना ज्याचा उजेड पुरेल अशा सत्याच्या प्रखर तेजाला गुलामगिरीनें आज लोपवून टाकायचें, आणि बाल्यावस्थेंत झांकून ठेवलेल्या अग्नीला जपून ठेवण्याकरितां—कित्येक वर्षांनंतर वारा घालण्याकरितां—मी स्वतन्त्र रहावयाचें, हा न्याय कोठला? मी विकले गेले तर कोणची हरकत? त्यांच्या पराक्रमाची चीज होण्याला काल आज अनुकूल नाहीं, पण उद्यां तो अनुकूल होईल; आणि गुलामगिरींत त्या वेळीं ते जर अडकून राहिले तर—तर—सिद्ध असलेल्या पराक्रमाला कालाशीं झुंजण्याला मोकळा न ठेवणें म्हणजे कोईनें झाड खाऊन टाकण्याचें विपरीत पाप करणें होय. पत्नीची माता होते, पण माता जर पत्नीला खाऊन टाकूं लागली—तर प्रसंगीं मुलाला खाऊन टाकून नवीन संसाराला आरंभ करणाऱ्या कुलटेप्रमाणें माझा अधःपात कशावरून होणार नाहीं? कुमार्गाकडचें पहिलेंही पाऊल उचलतां कामा नये. ज्या तारामतीला कालच्या स्थितीचें विस्मरण झालें ती उद्यां स्वतःकरितां रोहिदासालाही कशावरून विकणार नाहीं? [रोहिदास येतो.

रोहि०:—आई, आई, माणसें विकावयाचीं म्हणजे काय ग? बाबा

6723

म्हणे तुला आतां विकणार आहेत; माणसें विकावयाचीं म्हणजे काय ग? सांग ना?

तारा०:—माणसें विकावयाचीं? माणसें विकावयाचीं!

रोहि०:—तूं काय म्हैस आहेस, काय गाय आहेस? माणसें विकावयाचीं म्हणजे काय ग? सांग ना? अशी रडतेस कां?

तारा०:—काय सांगूं तुला? आणि तुला समजणार तरी काय? माणसें विकावयाचीं म्हणजे काय? माणसें विकावयाचीं म्हणजे काय!

रोहि०:—माणसें विकावयाचीं म्हणजे त्यांना रडायला लावायचें होय? तूं रडत असलीस म्हणजे बाबा तर तुझे डोळे पुसतात, मग तुला ग कसें विकणार? सांग ना, माणसें विकावयाचीं म्हणजे काय तें?

तारा०:—मी आज काय सांगूं तुला? आणखी कांहीं वर्षांनीं तुला तें समजूं लागेल. देवा! माणसें विकावयाचीं म्हणजे काय, याचा अर्थ प्रत्यक्षपणें जसा आज मला कळतो आहे तशा रीतीनें कळण्याचा प्रसंग माझ्या रोहिदासावर आणूं नको.

रोहि०:—रडूं नकोस गडे; बाबा हिथें आतां असते तर त्यांनींच तुझे डोळे पुसले असते; मी पुसतों तुझे डोळे. (तसें करितो) सांग आतां माणसें विकावयाचीं म्हणजे काय तें?

तारा०:—बाळा रोहिदासा, तुझ्या कोमल हाताच्या स्पर्शानें माझ्या डोळ्यांतलें पाणी मागें न हटतां अधिकच बाहेर येतें, त्याला मी काय करूं?—माणसें विकावयाचीं म्हणजे काय? माणसें विकावयाचीं म्हणजे काय!—नाहीं रे, तुला हें समजायचें नाहीं.

रोहि०:—न समजायला काय झालें? बाबा लांकडें विकतात, तें मला समजतें; चित्रगुप्त म्हैस विकत घेतो, तें मला समजतें; अन्नपूर्णा लाडू विकते, तें मला समजतें; गंपु भांग विकतो, तें मला समजतें; तुला विकावयाची म्हणजे काय ग? मी धाकटा असतांना बाबा राजे होते; त्यावेळीं मला पाजायला दाई ठेवली होती. थोरल्या माणसांकरितां गाय-म्हैस आणि धाकट्या मुलांकरितां तुला विकायची होय?—असें नव्हे तर कसें? तुला काय म्हणून विकायची?

तारा०:—नाहीं रे बाळा, तुला समजायचें नाहीं.

रोहि०:—तर मग गंपूच्या भांगेप्रमाणें तुला प्यायची नाहीं ना? लाडूप्रमाणें तुला खायची नाहीं ना? लांकडाप्रमाणें तुला जाळायची नाहीं ना? सांगना आई, माणसें विकायचीं म्हणजे काय?

तारा०:—हां हां मी दुसऱ्याच्या मुलांना प्यायला घ्यायचें, मला प्यायचें, मला खायचें, मला जाळायचें, हें सर्व खरें आहे; पण माणसें विकायचीं म्हणजे त्याच्याही पलीकडचें आहे. मी दुसऱ्याच्या मुलांना पाजले म्हणजे माझी अब्रू जात नाहीं, माझ्या पायांना आणि हातांना शेवटीं स्मशानांत जाळायच्या स्थितीपर्यंत राबायला लागलें, तरी अब्रू जात नाहीं; पण माणसें विकतांना अब्रूही विकावी लागते.

रोहि०:—अब्रू विकूं नये.—अब्रू म्हणजे कायग आई?

तारा०:—तारुण्याचें फूल प्रथम ज्याप्रमाणें शरिराला येतें, आणि मग कर्तेपणाचें फळ ज्याप्रमाणें शरिराला लागतें, त्याचप्रमाणें अब्रूचें फूल प्रथम प्राणांना येतें आणि नंतर सत्याचें फळ प्राणांना लागतें. तूं मोठा झालास म्हणजे शरिरांत आत्मा राहतो हें तुला आपोआप कळूं लागेल; आणि प्राणांचें फूल व फळ म्हणजे काय तें समजेल.

रोहि०:—शरिरांत आत्मा आहे, हें कळूं लागलें म्हणजे मनुष्य मोठा होतो होय? तुला कळतें काग आई, तुझ्या शरिरांत आत्मा आहे हें?

तारा०:—मला कळतें, आणि तुलाही कांहीं वर्षांनीं कळेल.

रोहि०:—नाहीं आई; मी जीवंत आहें, हें आजपासूनच मला कळूं लागलें आहे. बाबा मजकडे पाहून दीर्घश्वास टाकतात—तुझे डोळे पाण्यानें भरून येतात—त्यावेळीं मीही रडूं लागतों; तुझाच जीव जर माझ्या शरिरांत नसता, तर माझे डोळे पाण्यानें भरते का? बाबांचा आत्मा जर माझ्या शरिरांत नसता तर त्यांच्याबरोबर मीही कसा रडूं लागलों असतो?—आतां नाहीं काग मी मोठा झालों?

तारा०:—आम्हांप्रमाणें डोळ्यांतून नेहमी पाणी काढायचें हें जर तुझें दैव असेल, तर बाळा तूं मोठा न झालेला मला पत्करलें!—तूं मोठाही होऊं नकोस आणि माणसें विकायचीं म्हणजे काय तें तुला कधीं कळूंदेही नको.

नकोरे बाळा तुला तें केव्हांच कळूंदे नको; कारण, न कळणें हेंही सुखच आहे.

[दोन दासी येतात.

पहि०:—हा पहा रोहिदास येथेंच आहे!

दुस०:—म्हशीबरोबर पारडूं म्हणून शेटजी म्हणाले, तें कांहीं खोटें नाहीं.

तारा०:—अग याला घरींच ठेवा बाजारांत आणूं नका, म्हणून मी सांगितलें होतेंना?

पहि०:—पण शेटजी म्हणाले, गाय विकावी लागली तर वासरूंही बरोबरच जावें लागतें, असा गुलामाच्या चौकाचा कायदा आहे.

दुस०:—समजलास रोहिदास, तुलाही आईबरोबर विकायचें!

पहि०:—चित्रगुप्त म्हणाले, तारा आणि रोहिदास दोघेही विकले गेले तर तारेचें लुगडें तूं घे—

दुस०:—आणि रोह्याचे कपडे तूं घे. म्हैस विकावयाची पण दावें कांहीं विकावयाचें नाहीं. म्हणून आम्हीं धांवत धांवत आलों. म्हटलें, कोणी तरी मधल्या मध्येंच तारेचें लुगडें चोळी पळवायचा!

पहि०:—आम्ही बरोबरीनें ढलप्या वेंचल्या आहेत, गोऱ्या लावल्या आहेत, मोळ्या वाहिल्या आहेत; उगीच कां? लुगडें चोळी सगळें आमचें!

[चित्रगुप्त येतो.

चित्र०:—तें कांहीं तुम्हांला मिळायचें नाहीं. त्या सर्वांवर बच्याजी दलालाचाच हक्क आहे.—तरी म्हटलें तूं कुठें वाट चुकलीस?—हं रोह्या, उचल पाय; चल तारे झटपट चल.—हा गुलामांचा चौक जवळ आला.—रोह्या, आईला मिठी मारून उगीच काय रडतो आहेस? तारे अशी रडतेस काय? तूं असें रडवें तोंड करून जर चौकांत गेलीस, तर पांचशे कवड्या कोणी तुला देणार नाहीं; मग पांचशे मोहरांची बात दूरच राहिली.—म्हशीला बाजारांत न्यायचें झालें तर दोन दिवस धार कोणी काढीत नाहीं; आज पोटभर जेवली तरी आहेस का? अग, नवऱ्यामुलीप्रमाणें न्हाऊं घालून जरा बरी दिसेलसें करायला पाहिजे होतें. गुलामगिरी म्हणजे दुसरें लग्नच समज म्हणजे झालें.—स्वयंवराला राजकन्या चालली आहे अ

झोकानें गुलामांच्या चौकांत प्रवेश कर म्हणजे विश्वामित्राचें देणें तुझ्या एकटीवरच फिटून जाईल.—चल रोह्या माझ्या बरोबर.—तुला असा ओढून—न्या त्याला पुढें घालून.—न्या झटपट—अस्सा अस्सा न्या.—चल ये तारे माझ्या पाठोपाठ ये.—नीट डोळे पुसून, केस सावरून, नेसणें चापून चोपून, नवऱ्यामुलीसारखी ये. [ दासी, रोहिदास व चित्रगुप्त जातात.

तारा०:—गुलामगिरी म्हणजे अब्रूला येणारा मृत्यूच होय; मृत्यूनें पूर्वीची आठवण बुजते; पण गुलामगिरीमुळें पूर्वजन्मींच्या आठवणीसकट इहलोकच्या नरकांत अब्रूला जन्म घ्यावा लागतो. या जन्माला मी कां भ्यावें? सत्याच्या प्रकाशानें पवित्र झालेला हा देह देणें तसेंच राहून जर पडला—आणि घाणेरड्या देहांत—अंधाराच्या देहांत—खरोखरीच्या नरकांत मला जर जन्मास यावें लागलें—त्यापेक्षां सत्यनिष्ठेच्या जोरावर गुलामगिरीच्याही नरकांतून पार निसटून जाणें काय वाईट? गुलामगिरीचा काळ! बेअब्रूचा काळ! हा प्रसंग कोणाला आलेला नाहीं? ह्या गुलामगिरीनें कोणाला गांठलेलें नाहीं? सर्वसत्ता ह्याच्या हातांत एकवटली आहे म्हणून ज्याच्याकडे लोक बोटें दाखवितात, तोच दैवाचा पुतळा सभोंवारच्या प्रभावळीचा गुलाम असतो; मी माझ्या बुद्धिसामर्थ्यानें सर्वांच्या शेंड्या हातांत धरल्या म्हणून प्रौढी मिरविणारा स्वतःच्या धंद्याच्या चिमुकल्या शिशींत आपली बुद्धि गाडून ठेवतो; मेहनती व दक्ष आमचे आम्हींच ह्या शेखीनें सर्व विश्वाला दणदणून सोडणारे हातपाय सेवेच्या शृंखलांनीं जखडलेले असतात; रोहिदासा, ह्या सर्व कर्त्या पुरुषांना तरी स्वतःची गुलामगिरी कोठें उमगते! सत्याचा अचल सूर ज्यांच्या कानांनीं ऐकला आहे, सत्याचें निर्मळ तेज ज्यांच्या डोळ्यांनीं पाहिलें आहे, सत्याचा सर्वव्यापी स्पर्श ज्यांच्या देहाला झालेला आहे, त्यांनाच गुलामगिरीचीं नानातऱ्हेचीं सोंगें ओळखतां येतात. स्वातंत्र्याचें सोंग घेऊन वावरणारी बेअब्रू म्हणजे खून करण्यापूर्वी सत्याला दिलेली भूल होय; ही भूल अंगावर चढूं न देतां—सत्याचरणाचे वेळीं झोपीं न जातां—पत्करलेला सेवाधर्म म्हणजे अंगावर चाल करून आलेल्या समुद्राचे लाटेला दुबळ्या मानवकुडीनें पायाखालची जागा न सोडतां अंगावरून देहाचे मळासकट वाहूं देणें होय. मी माझा देह विकण्याकरितां

आतां गुलामांच्या चौकांत जात नसून माहीत नसलेलीं पातकें धुवून टाकण्याकरितां धनाढ्यांची सेवादासी व्हावयाला जात आहे. [जाते.

---

## प्रवेश चवथा.

**स्थळः**—काशींतील गुलामांचा चौक.

[विश्वामित्र, तारामती, रोहिदास, चित्रगुप्त, बचंभट, त्रिवेदी, चौवेदी, रत्नपाल, सुवर्णदासी, अन्नपूर्णा, गंपु, मोलकरणी, डोंब वगैरे हजर असून मध्यें चबुतऱ्यावर हरिश्चंद्र उभा आहे.]

**बचं०:**—(झंगट वाजवून) ऐका, ऐका, गुलामांच्या चौकांतील सर्व शेटसावकारहो, धनिकहो, ऐका; पांच महिन्यांपूर्वीं आयोध्येचा राजा असलेल्या, व हल्लीं काशींत लांकडें फोडून मोळ्या विकणाऱ्या ह्या हरिश्चंद्रानें ऋषिवर विश्वामित्र यांच्या हजार मोहरा देणें आहे. मोळीविक्याचा धंदा करून याचा उदरनिर्वाह होणेंही मुष्किलीचें असल्यामुळें देणें फेडण्याकरितां स्वतःस विकून टाकण्यास हा राजीखुषीनें गुलामांच्या चौकांत उभा राहिला आहे. ह्याची विक्री पेढीवाले चित्रदास गुप्तदास यांच्या मार्फत मी बच्याजी दलाल करीत आहे. तर ज्यांना हें सणंग विकत घ्यावयाचें असेल त्यांनीं सवाल बोलावेत.

**त्रिवे०:**—कायरे हरिश्चंद्रा, तुला स्वयंपाक करायला येतो का?

**हरि०:**—शिकविलात तर मी करीन.

**चौवे०:**—शिकविलात तर मी करीन! ह्याला वाटतें आम्ही शास्त्री पंडित याला दत्तक घेण्याला येथें आलों आहों. अरे ए, लोक आपआपल्या मुलांना शिकवून तरबेज करीत असतात; गुलामाला कोण रे बाबा शिकविणार? तुला काय येतें याचा पाडा तरी वाच, म्हणजे किंमत बोलायला ठीक पडेल.

हरि०:—मी पूर्वी राजा होतों; ह्या पांच महिन्यांत लांकडें फोडायला शिकलों आहें.

चित्र०:—तुमच्यापाशीं राज्य असलें तर हा तें चांगलें संभाळील; लांकडांची वखार असली तर हा चांगलें—बरें—निदान वाईट तरी कामकाज करणार नाहीं.

बचं०:—बोला, आंकडे लवकर बोला.

विश्वा०:—ह्यानें माझ्या हजार मोहरा देणें आहे, हें ध्यानांत ठेऊन आंकडे बोला.

रत्न०:—आपल्यापाशीं राज्यही नाहीं आणि लाकडाची वखारही नाहीं; मोहरा कोण देणार याला! हजार कवड्या देखील याची किंमत नाहीं.

सुव०:—पोटाला घालूं, एवढ्यावरच मिळत असला तर घ्यायचा होता विकत.—असला एखादा राजपिंडा माझ्या देवडीवर असला तर वाईट नाहीं दिसायचा.

रत्न०:—राजपिंडा तुझ्या महालांत ठेवण्याइतका कांहीं मी मूर्ख नाहीं. एक कवडीही याची किंमत नाहीं; इतकेंच नव्हे, तर फुकट मिळाला तरी हा मला नको.

डोंब:—माझ्या वखारींत लांकडें फोडायला एक मोहरेला मी विकत घेतों—

चित्र०:—अरे, तूं डोंब आणि माझ्या वखारांतला माणूस फितवूं पाहतोस? ही फितुरी आहे, हरिश्चंद्राचें आणि ह्याचें संगनमत झालेलें दिसतें!

डोंब:—ह्यांत फितूरी कसली आणि संगनमत कसलें! पांच महिने राबून घेऊन एक दिडकी देखील ह्याच्या दांतांवर टिचली नाहींत; आणि आतां संगनमताच्या आणि फितूरीच्या गप्पा झोडून हरिश्चंद्राला जन्मभर फुकट राबवायचा बेत दिसतो भटजी आपला?

चित्र०:—मी भटजी नाहीं; चित्रदास गुप्तदास पेढीवाला आहें; तोंड आटपून बोल, डोंबा; नाहींतर हिशोबांत पकडीन तुला डोंबा.

डोंब:—अरे जा जा, तुझें हिशोबाचें जाळें मला माहीत आहे.

मधुकऱ्या माशांना त्या जाळ्याचें भय दाखीव.—माझा सवाल एक मोहोर आहे.

चित्र०:—न्या, याला मोहरेला न्या नाहींतर हजार मोहरांना न्या.—ह्याला कांहीं चांगलीं लांकडें फोडतां येत नाहींत, हें माझें साफ मत मी जाहीर करतों; ह्यानें फोडलेल्या लांकडांनीं चिता रचली आणि ती ढासळली नाहीं, असें कधींच झालें नाहीं.—राजानें फोडलेलीं लांकडें, या पूर्वीच्या नांवलौकिकावर प्रथम प्रथम लांकडें खपलीं—आणि तोहि नांवलौकिक मीच गवगवा करून वाढविला होता—असा हा माझा मिंदा आहे—पण सगळें बिंग आतां बाहेर आलें आहे. ह्याची किंमत कवडीही नाहीं.

डोंब:—माझा सवाल एक मोहोर आहे.

चित्र०:—माझ्या शेजारचा वखारवाला, आणि अशी फितुरी करतोस काय? या असल्या दुहीमुळेंच आमच्या वाडवडिलांचें सर्व वैभव नष्ट झालें! डोंबा, तुला खरें खरें सांगतों, ह्याला एकही लांकूड सरळ फोडतां येत नाहीं.—काशींतल्या जुन्या लांकूडफोड्यांच्या कलेचा कणही ह्याच्या कुऱ्हाडीला शिवलेला नाहीं.—एक मोहर गमावून मागाहून रडत बसण्याची पाळी येईल.

डोंब:—माझा सवाल एक मोहर आहे.

चित्र०:—तुला अवदसाच आठवली, घालीव मोहर.—मला पक्कें माहीत आहे; तूं होऊन ह्याला थोड्या दिवसांनीं आपोआप हांकलून देशील; आणि मग बाहेर गेलेलं हें पांखरूं नाक घांसत—रडत—आमच्याच वखारींत परत येईल.

डोंब:—माझा सवाल एक मोहर आहे.

वच्या०:—एकवार एक मोहर.—कोण बोलतो आहे अधिक? एकवार एक मोहर.

हरि०:—मला आज पांचशें मोहरांचा हता भरायचा आहे, आणि सहा महिन्यांनीं पांचशें मोहरा द्यावयाच्या आहेत.—मला जर कोणी हजार मोहरांना विकत घेतलें—मी विकत घेतलेला नोकर व्हावयाला तयार आहें—

डोंब:—माझा सवाल एक मोहर आहे.

बच्या०:—काय कोणी अधिक बोलत नाहीं? एक मोहर एकवार, एक मोहर एकवार.—काय कोणी अधिक बोलत नाहीं? एक मोहर एकवार; एक मोहर एकवार? कोणीही अधिक बोलत नाहीं? बोला अधिक बोला.—एक मोहर एकवार.

डोंब:—माझा सवाल एक मोहर आहे.

बच्या०:—कोणीही अधिक बोलत नाहीं? धान्याच्या कणाची तेवढी किंमत काशीनगरीला समजावी, आणि रत्नाकडे न पहाणाऱ्या कोंबड्याप्रमाणें काशींतल्या थोर लोकांनीं गाजरपारखे ठरावें काय? बोला, अधिक बोला.

हरि०:—मला पांचशें मोहोरांची जरूरी आहे.

डोंब:—पण मला एकच मोहर तुझी किंमत वाटते.—माझा सवाल एक मोहर आहे.

बच्या०:—एक मोहर दोनवार; एक मोहर दोनवार.—काय कोणी अधिक बोलत नाहीं? एक मोहोर दोनवार; एक मोहोर दोनवार.—अयोध्येचा राजा हरिश्चंद्र एक मोहरेला विकला जात आहे; ज्याचा बाप सदेह इंद्राच्या सभेंत जबरदस्तीनें शिरला तो पुण्यशील हरिश्चंद्र एक मोहरेला विकला जात आहे; वरुणादिदेवतांकडून सत्यप्रतिज्ञ वसिष्ठाचा हा सत्यप्रतिज्ञ शिष्य म्हणून ज्यानें राजसूययज्ञाचे वेळीं म्हणवून घेतलें तो हा महात्मा एक मोहरेला विकला जात आहे.—एक मोहरेहून कोणी अधिक बोलत नाहीं काय! त्रैलोक्याला दिपवून सोडणाऱ्या गुणांची किंमत ह्या शहरांत एक मोहरेहून अधिक होत नाहीं काय? एक मोहर दोनवार, एक मोहोर दोनवार—हरिश्चंद्रा, बोलूं एक मोहर तीनवार?

हरि०:—मला पांचशें मोहरांची आज जरूरी आहे.—ह्या शहरच्या बाजारांत माझ्या कष्टाची किंमत एक मोहरच जर असेल, तर ती मोहर विश्वामित्रऋषींनीं घेऊन कर्ज फेडण्यास नालायख असलेल्यांच्या यातना सोसण्याचा मार्ग हरिश्चंद्राचे अंतःकरणास खुला करून द्यावा.—नालायखांचीं

दुःखें व नालायखांचा नरकवास सोसण्यास मी तयार आहें.—बोला, एक मोहर तीनवार—

विश्वा०:—नाहीं, इतक्यांत नाहीं. हरिश्चंद्रा, तूं नरकवासाच्या यातना सोसण्यास तयार असशील; पण त्यापूर्वी तुझी ऐहिक सत्ता व संपत्ति सर्व नष्ट झाली पाहिजे. एक मोहरेच्या किंमतीनें तुझे गुण विकले जातात खरे, पण बायकामुलांवरची तुझी सत्ता कोठें विकली जाते?—आहे नाहीं तें सर्व भरीं घाल, कांहीं शिल्लक ठेवूं नको, आणि मग नालायख दिवाळखोरांच्या नरकाचा मार्ग धर. कांहीं कूस बाजूला ठेऊन नरकांत पडणें, हें नरकवासाचें नुसतें सोंग आणण्यासारखें आहे.

हरि०:—आणि मग नरकवासाच्या यातना भोगणें, ही तपश्चर्या न होतां फसवणुकीमुळें सत्याची विटंबना होऊन नरकवासांत आत्मनाश होतो. विश्वामित्रमहर्षे, मी प्राणांचा नाश करूं इच्छित नाहीं, यातनांची तपश्चर्या करण्यास तयार आहें.

विश्वा०:—म्हणूनच अगोदर बायकोला वीक, उगीच फसवेगिरी नको; कर तारामतीला चबुतऱ्यावर उभी कर, तिचा लिलाव होऊं द्या, आणि मग नालायखांच्या दुःखाच्या होमांत तुझ्या शरिराची आहुती दे.

हरि०:—( चबुतऱ्यावरून उतरून ) तारामती, गुलामांच्या चबुतऱ्यावर चढ. तुझ्या शरीरकष्टाची विक्री करण्याची सत्ता धर्मानें व समाजानें पति या नात्यानें मला दिली आहे.—मला स्वतःला एक मोहरेहून अधिक किंमत येत नाहीं;—तुझ्यावरील सत्तेची मालमत्ता विकून नंतर मला पुढच्या मार्गाला लागलें पाहिजे.—माझ्या दुसऱ्या प्राणा, माझ्या दुसऱ्या मना, माझ्या दुसऱ्या शरीरा, गुलाम होण्याकरितां तुझा लिलाव मला करूं दे. ज्याची बाजारांत किंमत एक मोहरेहून अधिक ह्या शहरच्या वस्तींत होत नाहीं,—ज्याच्या शरीरयष्टीला, ज्याच्या अंतःकरणाचे फुलांना, ज्याच्या बुद्धीच्या फळांना, एक मोहरेहून अधिक किंमत येत नाहीं,—अशा वृक्षाला तुझ्यासारख्या सुकुमार वेलीनें दृढालिंगन देण्याचें साहस केलेलें असल्यामुळें तुझी निर्मल पत्नी व तुझ्या फुलांचा शुद्ध सुवास धनिकांना घेऊं दे.— सोड, तारामती मला सोड,—माझ्या शरिरासभोंवारचा तुझ्या हाताचा

विळखा काढ,—आणि नालायख नवऱ्याच्या अर्ध्या यातनांची वांटेकरीण होण्याकरितां ह्या गुलामांच्या चबुतऱ्यावर चढ.

**तारा०:**—सदेह स्वर्गाला चढणाऱ्या महात्म्याची मी सून आहें. ह्या चबुतऱ्यावर गुलाम होण्याकरितां मी चढत नसून स्वर्गाला सदेह नेणाऱ्या जिन्याची पहिली पायरी मी आतां चढत आहें. [ चबुतऱ्यावर उभी राहते.

**हरि०:**—( तिच्या पायावर मस्तक ठेवून ) सदेह स्वर्गारोहणाला लायख झालेल्या माझ्या प्राणा, क्षणभर तुझ्या पायावर मला अश्रू ढाळूं दे.—तुझ्या सहवासाला मी मुकणार—

**तारा०:**—महाराज, शोक करीत बसण्याची ही वेळ नव्हे; आपलें निष्ठुर व कठोर व्रत शांत चित्तानेंच पाळलें पाहिजे.

**हरि०:**—तारामती, वसिष्टमहामुनींच्या जागीं तूं ह्यावेळीं मला आहेस. माझ्या गुरूची आज्ञा शिरसा वंद्य करून ( उठून ) विश्वामित्रमहर्षे, मी माझ्या बायकोच्या विक्रीला सुरवात करतों.—आयोध्येचा राजा असलेल्या हरिश्चंद्राची ही बायको—महाराणी महासाध्वी तारामती—तिचा नवरा हा कवडीमोल ठरलेला हरिश्चंद्र बाजारांत विकीत आहे. मला पांचशे मोहरांची आज जरूरी आहे. ज्या कोणी धनिकाला राजाची राणी आपल्या घरची मोलकरीण करण्याची इच्छा असेल त्यानें हिला विकत घेण्याची संधि दवडूं नये.

**बच्या०:**—बोला, तारामतीची किंमत बोला. हरिश्चंद्राची किंमत एक मोहर झाली; आतां तारामतीची किंमत करा.

**चित्र०:**—बोल, डोंबा, बोल; सवालाला तूंच प्रथम आरंभ कर; सर्वांत खालच्या पायरीनें मगाशीं सर्वांत अधिक सवाल बोलला—

**डोंब:**—पण माझ्या घरीं सुंदर स्त्रियांना देण्यासारखें कामच नाहीं, सौंदर्याच्या खेळाकरितां समाजांतील वरच्या पायऱ्या असतात, म्हणून तारामती मला फुकट मिळाली तरी नको.

**चौबे०:**—सुंदर स्त्रियांवर पैसे कसे मिळवावे हें मला चांगलें समजतें; माझा सवाल एक मोहर आहे.

**त्रिवे०:**—द्रव्यार्जनाचा राजमार्ग सौंदर्य आहे; माझा सवाल अकरा मोहरा.



**तारा०:**—स्वर्गाला सदेह नेणाऱ्या जिन्याची पहिली पायरी मी आतां चढत आहें.

[ पृ ५०

चित्र०:—हरिश्चंद्रा, तुला मी आतां खरें खरें सांगतों; तुझीं लांकडें भरीं खपतात ह्याचें कारण, तारामतीचा चेहरा पाहण्याकरितां माझ्या वखारींत गिऱ्हाइकांची झुंबड पडत असे; माझा सवाल एकवीस मोहरा.

अन्न०:—तारामतीच्या गोंडस हातांनीं वाढलेलें पक्वान्न दुप्पट किंमतीला विकलें जाईल; अन्नपूर्णागृहाचा सवाल एकतीस मोहरा.

गंपु०:—तारामतीच्या हातचा घोटा लाळ घोटत लोक पितील; माझा सवाल एकेचाळीस मोहरा.

सुव०:—(स्वगत) असली सुंदर स्त्री आमच्या घरच्यांच्या हातीं लागूं देतां कामा नये; (उघड) माझा सवाल एकावन्न मोहरा.

रत्न०:—सर्व रत्नांत स्त्रीरत्न श्रेष्ठ होय. राजाची राणी ह्या रत्नपालाची दासी झालीच पाहिजे.—माझा सवाल एकशे एक मोहरा.

विश्वा०:—हरिश्चंद्रा, पाहिलेंस? तारामतीची किंमत शुक्लपक्षांतील चंद्राप्रमाणें प्रत्येक सवालाला वाढते आहे; चारपांच सवालांत त्या किंमतीचा पूर्णचंद्र होऊन पांचशे मोहरा तुझ्या हातीं येतील; नवऱ्याची किंमत एक मोहरही नाहीं, आणि बायकोची किंमत पांचशे मोहरा!—हरिश्चंद्रा, ह्या नगरच्या बाजारांत तूं आमावास्या ठरलास, आणि तारामती पूर्णिमा ठरली.—बायकोच्या जिवावर कर्ज फेडणें ह्याहून अधिक मानहानि पुरुषांना नाहीं; ह्या मानहानीपेक्षां माझी दया भाकणें तुला अधिक मानहानीचें वाटतें काय? बोल, एक शब्द आर्जवाचा बोल, तुला कर्जांतून मुक्त करून पूर्णिमेच्या चंद्राप्रमाणें अयोध्येच्या सिंहासनावर तुला प्रकाशित मी पाडतों.

हरि०:—बऱ्याजी, सवाल बोला; विक्रीचें काम पुढें चालूं दे.—आयोध्येचा राजा हरिश्चंद्र याची राणी तारामती विकली जात आहे.—मला पांचशे मोहरांची जरूरी आहे. बोला, एकशे एक मोहरा एकवार.

बऱ्या०:—बोला, एकशे एक मोहरा एकवार, त्रैलोक्यसुंदरी म्हणून नांवाजलेली तारामती—एकशे एक मोहरा एकवार.

सुव०:—माझा सवाल दोनशे एक मोहरा.

रत्न०:—तुला काय करायची असली दासी? [illegible] चार

पुरुष करूं शकतात; बायका करूं शकत नाहींत.—माझा सवाल दोनशे एक मोहरा.

सुव०:—माझ्या वडिलांनीं पन्नास वेळां दिवाळें काढून सर्व मालमत्ता माझ्या नांवाची केली, आणि आपण शंभर वेळां दिवाळें लग्नाच्या पूर्वींच काढलेलें होतें म्हणून म्हातारपणींही आपणाला मला दिली.—आपल्या सर्व मालमत्तेची कागदोपत्रींची मालकीण मी आहें. मी म्हातारपणींही आपणाशीं लग्न केलें तें असली सुंदर दासी आपल्या महालाचे विहिरींत लोटण्याकरितां नव्हे.—माझा सवाल तीनशे एक मोहरा.

रत्न०:—अग हो हो, मोठी आली आहे माझ्यावर वरचढ करायला!—मी म्हणे शंभर वेळां दिवाळें काढलें; हो हो आणखी हजार वेळां दिवाळें काढीन, आणि माझ्या चैनींत सामील होणाऱ्या एखाद्या तारामतीच्या नावानें क्रोडो मोहरांची मालमत्ता करून ठेवीन. पूर्वींचीं दिवाळीं काढलीं तीं माझ्या चैनीकरितां, तुझ्या नव्हे; आणि पुढेंही दिवाळीं काढीन तीं माझ्या चैनीकरितां.—दिवाळें काढलें म्हणे दिवाळें काढलें; त्यांत कसली लाजलज्जा आहे? दिवाळीं काढून असलें स्त्रीरत्न जर हातचें गमावलें तर मात्र माझी छी:थू: खरी!

तारा०:—महाराज, माझी विक्री होऊन मी मोलकरीण मात्र व्हावयाची आहे, सर्वांगदास्य पत्करण्याचा हा लिलाव चाललेला नव्हे.

रत्न०:—होय, होय; तें मला माहीत आहे. हजार पांचशे मोहरांना मीं जनावर विकत घेईन, आणि पान्हा फुटण्याकरितां हजार दोन हजारांचें आंबोण घालीन; मग काय तक्रार? माझा सवाल चारशे एक मोहरा.

सुव०:—असल्या ह्या दिवाळखोर कोट्याधीशाच्या घरांत बायको लोटण्यापेक्षां, हरिश्चंद्रा, तूंच आपल्या अब्रूचें दिवाळें काढीनास?

रत्न०:—काढूं दे पाहिजे तर हरिश्चंद्र आपलें दिवाळें; माझी ना नाहीं; बसूं दे त्याला माझ्या पंक्तीला.—दिवाळें काढण्यांत कसली शरम आहे? आणि आजपर्यंत कोणी दिवाळें काढलें नाहीं? चित्रगुप्तासारखा कारकून दोन दिडक्यांसाठीं आपल्या कमलदानाचें दिवाळें काढतो;



तारा०:—नाहींरे बाळा, तुला समजावयाचें नाहीं. [ पृ. ५२.

खाऊन पिऊन धष्टपुष्ट बनविलेलीं पैलवानांचीं हाडें रुप्याच्या तोड्यासाठीं किंवा चांदासाठीं आपल्या बलाची विक्री करून हातांतील तलवारीचें दिवाळें काढतात; दोन दिवसांच्या स्वास्थासाठीं कवित्वाच्या भराऱ्या श्रीमंताच्या चेहऱ्यासभोंवतीं मारून कवि आपल्या काव्याचें दिवाळें काढतो; बुद्धिवान् म्हणून नांवाजलेला तत्त्ववेत्ता शेळ्यामेंढ्यांप्रमाणें आपली बुद्धि दोन घटिकेच्या आरामासाठीं विकून आपल्या बुद्धिवैभवाचें दिवाळें काढतो; लोखंडाचे चणे खाऊन राहणारे विश्वामित्रासारखे तपस्वी मेनकेच्या क्षणैक चुंबनासाठीं आपल्या तपश्चर्येचें दिवाळें काढतात; ह्या नगरींत कोण दिवाळखोर नाहीं? दिवाळें काढायचें तें तुपासाठीं काढायचें, मग असलें साजूक तूप वाढून पुढें ठेवलें असतांना मी पानावर बसल्याशिवाय कसा राहीन? माझा सवाल चारशें एक मोहरा आहे.— दोनवार, तीनवार झटपट करून टाका.

हरि०:—मला पांचशें मोहरांची जरूरी आहे.—अयोध्येचा राजा हरिश्चंद्र याची राणी तारामती चारशें मोहरांना विकली जात आहे.—मला पांचशें मोहरांची जरूरी आहे.—चारशें एक मोहरा दोनवार, दोनवार.— कोणी अधिक बोलत आहे?

सुव०:—माझा सवाल पांचशेंएक मोहरा.—बोला तीनवार.

हरि०:—पांचशें मोहरा तीनवार.—तारामतीला पांचशें मोहरांना सुवर्णदासीबाईसाहेबांना मीं विकलें आहे.

रत्न०:—हरिश्चंद्रा, तूं घाई केलीस, मी हजार मोहरांपर्यंत लिलांव वाढविला असता.—बरें हिची दासी तरी झाली ना? ह्या दरवाज्यानें नाहीं तर त्या दरवाज्यानें माझ्याच घरांत येणार! दहावीस हजार मोहरा खर्च करून माझ्या महालाचा रस्ता तारामतीला दाखवीन तरच शंभर दिवाळीं काढण्याचें सार्थक्य होईल. [जातो.

सुव०:—लाभली बरें तुम्हांला तारामती लाभली! मोलकरणीच्या नांवाखालीं सवत घरांत नांदायला आणण्याइतकी कांहीं मी मूर्ख नाहीं.— माझ्या माहलांत आली कीं हिला छळून छळून ह्या लक्ष्मीच्या अंगावरचें मासच दहापन्धरा दिवसांत जाळून टाकतें, खप्पड गालावर डोळ्यांच्या खाचा बसवितें, मग पाहूं जाळलेल्या लावण्याचे कोळशावर तुम्ही कितीसें

भाळतां तें!—हरिश्चंद्रा, तारामतीला दे माझ्याबरोबर पाठवून.—महर्षे, तारामतीनें माझ्या अंगणांत पाऊल टाकलें कीं आपल्या पदरांत पांचशें एक मोहरा पडल्याच म्हणून समजा.

बच्या०:—वरची एक मोहर माझी दलाली कापून घेऊन पांचशें मोहरा आपल्या मठांत मी पोंचवीन.

तारा०:—बाईसाहेब, माझ्याबरोबर माझें लेंकरूं आहे.

सुव०:—रोहिदासाला मी माझ्याबरोबर घेऊन जाते.—वासरामागोमाग गाय आपोआप येईल. चल पोरा माझ्याबरोबर चल.—हा माझा शेला घे आणि चाल माझ्यापुढें.

रोहि०:—मी आईबरोबर येतों.

सुव०:—काय पोर उद्दाम पहा!—मालक सांगेल तसें निमूटपणें ऐकलें पाहिजे.—घे हातावर शेल्याची घडी. (तसें करविते) चल असा माझ्यापुढें. राजपुत्र माझा गुलाम आहे, हें सर्व लोकांना आज समजलें पाहिजे.—चल माझ्यापुढें शेला घेऊन.

रोहि०:—आईग, आईग, आईग.

सुव०:—आतां आईग बिईग कांहीं नाहीं. असा कान धरून कोंकराप्रमाणें तुला खेंचत नेलें पाहिजे.—ओरड आईग, ओरड आईग; दाब्लाच जोरानें कान—असा असा—चाल माझ्यापुढें. [कान धरून नेते.

रोहि०:—आईग, आईग, आईग.— [जातो.

विश्वा०:—चित्रगुप्त, बच्याजी, तुम्ही सर्व जा इच्या मागोमाग आणि पांचशें मोहरा मोजून घ्यायला लागा.—व्हा पुढें; तारामतीला घेऊन मी आलोंच तुमच्या मागोमाग. (चित्रगुप्त, बच्याजी वगैरे जातात.) तारामती, चल माझ्याबरोबर, तुला ह्या सुवर्णदासीच्या अंगणांत पोंचविल्यावर मला मोहरा मिळावयाच्या आहेत.—चल, उचल पाय; हरिश्चंद्राकडे पहात उभी राहून कसें भागणार?—चल, उचल पाय.—डोळ्यांत हे अश्रू कां? हरिश्चंद्रा, तुझेही डाळ पाण्यानें कां भरून आले? (तारामती हरिश्चंद्राला भेटते.) (स्वगत) हरिश्चंद्रा, तुमच्या डोळ्यांतील अश्रूंच्या ह्या गंगायमुनेच्या संगमांत गुप्तपणानें मिळणारी माझ्या डोळ्यांतील सरस्वती

ह्या वेळीं प्रगट होऊं पहात आहे; ह्या सरस्वतीला डोळ्यांतल्या डोळ्यांत मला कोंडून ठेवतां येत नाहीं.—(उघड) राजा, तुमची ही विपन्न स्थिति पाहून माझें मन दयेनें द्रवलें आहे; माझ्या डोळ्यांतले हे अश्रू माझा नेत्र सोडतांना तुलाही कर्जांतून सोडण्याविषयीं मला सांगत आहेत.— तारामती, सदैव तूं तुझ्या नवऱ्यापाशींच रहा; मी आपण होऊन तुम्हांला कर्जमुक्त करण्यास तयार आहें.

हरि०:—महाराज, दान घेणें हें आम्हां क्षत्रियांचें शील नव्हे; आपण मला कर्जमुक्त केल्यानें मी कर्जमुक्त होत नाहीं; कर्ज फेडल्यानेंच मी कर्जमुक्त होणार आहें. कर्ज फेडणें, हें माझें काम आहे; आपलें नव्हे.—वियोगाचे वेळीं हिला भेटतांना माझ्या डोळ्यांतून अश्रू आले, हें खरें; पण हें दुःख कर्जाबद्दल नसून कर्ज फेडण्याचे उद्योगांत हिची आणि माझी ताटातूट होणार म्हणून आहे.—जा, तारामती, जा. तुझ्या नवऱ्याचें अर्धें कर्ज तूं फेडलें आहेस.—जा, सुखानें जा.

विश्वा०:—कठोरा, तारामतीसारख्या साध्वीला कोणाचे घरांत जावयाला सांगतोस, कांहीं विचार केलास काय? पोषाखाचे छानछुकींत आनंद मानणाऱ्या एक नटवीचें दास्य करावयाला तूं सांगत आहेस; आणि लोकांचें धन लुबाडणें ज्याचा रोजचा खेळ अशा एका पाप्याच्या मोहजाळांत तूं आज ह्या साध्वीला अडकावीत आहेस. हरिश्चंद्रा, दुनियेची ही हलकट स्थिति पाहून माझ्या सदय अंतःकरणाचें ओझें वाहण्यांत कांहीं कमीपणा नाहीं असें तुला नको का वाटावयाला?

हरि०:—महाराज, आपल्यासारख्या सदय व कोमल मनाचे प्रेमजलांत सदैव स्नान करावेंसें कोणाला वाटणार नाहीं? मी घमेंडीनें ह्या सुखापासून पराङ्मुख होत आहे, असें मानूं नका; पण ज्या पुरुषाचे शिरावर लोकांना खऱ्या कर्माचा कित्ता घालून देण्याचा बोजा आहे— अयोध्येच्या सिंहासनावर ज्याला बसावेंसें वाटतें—त्याच्या मस्तकावर राजमुकुटाबरोबर हा बोजा परमेश्वरानें ठेवलेला असतो.—खऱ्या कर्माचा धडा घालून देण्याचा बोजा ज्याचे मस्तकावर आहे, त्यानें आपल्या शब्दाला जागून—सत्याला स्मरून—स्वतःचें कर्ज स्वतःच नकोका फेडायला? कर्ज

फेडण्याचे कष्ट न सोसतां आपल्या दयेचें अमृतप्राशन जर मीं आरामानें केलें, तर ह्या चित्रगुप्तांत—ह्या बच्याजी दलालांत—ह्या सुवर्णदासींत—ह्या दिवाळखोर रत्नपालांत आणि माझ्यांत काय फरक उरला? विपरीत काळाचे ओघांत वहात जाऊन पापाचरण ज्यांच्या अंगवळणी पडलें आहे त्यांच्याचप्रमाणें आम्हीं जाणत्यांनीं जर वर्तन केलें तर दुष्ट काळाला पुष्ट केल्याचें पातक आम्हांला लागणार आहे. महाराज, ह्या गुलामांचे बाजारांत ज्या काळाचें आपणाला आतां दर्शन झालें, तो काळ ब्रह्म-वृत्तीचा काळ नव्हे, क्षात्रवृत्तीचा काळ नव्हे, तर वेश्यावृत्तीचा काळ आहे. ह्या वेश्यावृत्तीचे काळाचे शेंडींतला एक तरी केस हातांत पकडून सत्याचे जोरावर ह्या वेश्यावृत्तीचे वाकडें पाऊल सरळ करण्याचा माझा उद्योग आहे.—नासक्या काळाचे सडक्या प्रवाहांत वहात जाण्याची माझी इच्छा नसून सत्याचे छातीचा बांध बांधून सांप्रतचा ओघ फिरविण्याचा माझा विचार आहे—

विश्वा०:—आणि म्हणून पापाचे कूपांत ह्या साध्वीला लोटून देत आहेस?

हरि०:—होय, पापाच्याच राशींत ही आज पडत आहे, हें माझ्या उद्योगाला मी सुचिन्हच समजतों.—जा, तारामती, जा; त्या दिवाळखोर खिसेकापूंच्या घरांत जा; तुझ्या सहवासानें सत्याचा प्रकाश त्यांच्या पापावर पडूं दे.—महर्षे, सूर्याचे सहस्रकर दैदिप्यमान तारामंडलावर पडून काय उपयोग? पृथ्वीतलावरील अंधःकाराच्या पर्वतमय राशी शोधून काढून,—ज्या झांकलेल्या जागेंत चोरून मारून पापाचे ढीग निर्माण करणारे दुराचाऱ्यांचे कारखाने चाललेले असतात त्या अंधाऱ्या जागेंत हळूच झरुक्यानें शिरून—सूर्याचे किरणांना पृथ्वीतल स्वच्छ करावें लागतें.—माझ्या अंतःकरणांतील सत्याचे प्रकाशा, जा, गुलामगिरीचे झरुक्यांतून आंत शिरून ह्या नगरींतल्या सर्व पापी कोठड्या पुण्यमय कर. जा, तारामती, जा; पुण्याचा व सत्याचा फैलाव करण्याकरितां समाजाचे सर्वांत नीच स्थितींत—गुलामगिरींत—जन्म घेण्यास जा. [ पडदा.

---

# अंक तिसरा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ**—सुवर्णदासीचा महाल.

[ दोन दासी प्रवेश करितात. ]

पहि०:—कायग, आमचें नशीब एवढें मोठें असेल, असें मला स्वप्न देखील पडलें नव्हतें; दोनचार महिन्याचे अवधींत आम्हीं ह्या रत्नपालाच्या घरीं मोलकरणीच्या मालकीणी झालों !

दुस०:—मला वाटतें, हा महाल, हे दागिने, हे शालू, सर्व कांहीं आम्हांकरितांच आहे !–काल तूं सुवर्णदासीचा शेला अंगावर घेऊन चित्रदासाच्या वखारींत गेली होतीस, आणि बाईसाहेब आल्या म्हणून चित्रदास तुला सामोरा आला नव्हे ? मेला पुरा फसला, पाहतो तों त्याच्या वखारींत ढलप्या वेंचणारी मोलकरीण !

पहि०:—फसला नाहीं हो; तो मेला मला म्हणाला, रत्नपालाची मर्जी सुप्रसन्न करून वैभवाला चढली आहेस, तेव्हां बाईसाहेबांनीं आतां वखारींतल्या लांकूडफोड्यांना गुप्तभेटी देण्याचें सोडून द्यावें.

दुस०:—मग फसला नाहीं तर काय ? रत्नपालाची मर्जी का तुझ्यावर आहे ? तारामतीला वश करून घेण्याकरितां रत्नपालानें तुझा बडेजाव चालविलेला आहे.

पहि०:—आणि सर्वांना वाटतें रत्नपाल माझ्या नादीं आहे.–फसूं द्या सर्व जण अशा रीतीनें; मला रत्नपालाचे पैसे पाहिजे आहेत; बाकी त्या ढेरपोट्या थेरड्या पेढीवाल्यापेक्षां वखारींतले लांकूडफोडेच किती तरी चांगले !–तुला आवडतो कां ग हा दिवाळखोर ?

दुस०:—अग दिवाळखोर काय, दरवडेखोर काय, दोघेही सारखेच. आमच्या कुळांत कीं नाहीं सातपिढ्या कोणीं चोरी केली नाहीं, आणि माझ्या आईनें कोणाही चोराकडे वांकड्या नजरेनें केव्हांही पाहिलें नाहीं. मी वाटच बघतें आहे, हा थेरडा दरवडेखोर केव्हां माझा हात धरतो, आणि मी त्याची खेटरपट्टी काढतें; लांकूडफोड्या जर घरफोड्याचा धंदा करूं लागला, तर आई साफ सांगत असे, आमच्या घरीं पाऊल टाकूं नको.

पहि०:—खरेंच गडे, सावाचे साव राहून आमची चैन चालली आहे; रत्नपाल मोठामोठीं लुगडीं मला देतो,—

दुस०:—सुवर्णदासी जुने शालू मला देते,—

पहि०:—रत्नपाल तारामतीला पोंचवावयाला उत्तम खाद्यपेयें मज-पाशीं देतो,—

दुस०:—आणि सुवर्णदासी तें सर्व माझ्या पाळतीमुळें मधल्यामध्यें लुबाडून घेऊन मला चारते!—खूप चैन चालली आहे. मालकांचे गुप्त आणि बारीक काम नोकराकडे आलें म्हणजे नोकरांची गुप्त आणि बारीक वेसण मालकांच्या मर्मस्थानीं बसलीच!

पहि०:—आणि मग नोकरांचे मालक होऊन मोलकरणी बाईसाहेबा-प्रमाणें अशा दिमाखानें महालांत वावरतात!

[ तारामती येते.

तारा०:—म्हटलें, बाईसाहेब, मला कां बोलावलें होतें?—चुकलें हो, मला वाटलें, सुवर्णदासी बाईसाहेब येथें आहेत.

पहि०:—वा, तारे, तूं आणि आम्ही मिळून दळप्या वेचीत होतों, आणि इतक्यांत आम्हांला विसरलीस?

दुस०:—रत्नपालाचा म्हातारा डोळा हिच्या डोळ्यावर असल्यामुळें वडस वाढल्यासारखी हिची दृष्टि झाली आहे; आतां कुठली ती आम्हांला ओळखणार?

तारा०:—अग, तुमची हीं उंचीं लुगडीं व दागिने पाहून मला बाई-

साहेबांचा भास झाला हो. सुरवंटाचीं फुलपांखरें झाल्यावर पूर्वाश्रमांतली ओळख लवकर कशी पटणार?

[ सुवर्णदासी येते.

सुव०:—तारे, ह्या दासीशीं बोलत बसूं नकोस, म्हणून मी तुला कितींदां ताकीद दिली? ह्या महालांत तूं कां आलीस, कां आलीस? मेलीं पायांतलीं खेटरें पायांतच पाहिजेत.—तुला गुलामखाना सोडून येथें यायला सांगितलें कोणीं? आज सहा महिने झाले, तुला मीं चटणी-भाकरीवर ठेविली आहे, आणि तूं लठ्ठीच्या लठ्ठी, वाळली कशी नाहींस? बोल, बोल कशी वाळली नाहींस?—चोरून खातीस, होयना चोरून खातीस?—राख घातली पाहिजे मेलीच्या तोंडांत. राखेचा तोबरा दिला पाहिजे.—चोरून खाती; चोरून खाती!

तारा०:—नाहीं, बाईसाहेब, मीं आजपर्यंत कांहींही चोरून किंवा मागून खाल्लें नाहीं.—चोरीच करायची होती, भिक्षाच मागायची होती, तर स्वतःची विक्री करण्याचें काय कारण होतें?

सुव०:—दिमाख आहे ना दिमाख! खरेपणाचा टेंभा मिरवावयाचा होताना? पण राजाची राणी असतांना जिभेला चोचल्यांची संवय लागलेली ती कुठें जाते? आज चोरी केलीस, उद्यां शिंदळकी करशील.—चटावलेलें माणूस कोणचें पाप करणार नाहीं?—सांगना मग, तूं लठ्ठीच्या लठ्ठ कशी आहेस? वाळली कां नाहींस?

तारा०:—मी काय सांगूं बाईसाहेब? चित्रगुप्ताच्या वखारींतून तिकडचा समाचार ही केव्हां केव्हां आणते; त्यांच्या प्रेमाचा निरोप ऐकला म्हणजे मनाचें सर्व दुःख नाहींसें होतें; ऋषींच्या मंत्राहूनही प्रेमाच्या शब्दांत अधिक सामर्थ्य असतें, असें म्हणतात.

सुव०:—कोणग तुला हरिश्चंद्राचा निरोप कळवितें?—ही कां?—ही का?—हरिश्चंद्राचा निरोप नसेल तो रत्नपालाचा—होयना? होय—होय—नाहीं म्हणतेस?—नाहीं म्हणतेस?

तारा०:—नाहीं, बाईसाहेब, नाहीं.—शेटजी मजपाशीं आजपर्यंत एक शब्दही बोलले नाहींत, आणि मींही त्यांच्याशीं एक शब्दही बोललें नाहीं.

सुव०:—बोलायला कशाला पाहिजे? बोंललें नाहीं म्हणे बोललें नाहीं?—जीभेनें बोलली नसशील;—जीभेनें नाहीं तर डोळ्यांनीं बोलली असशील; हातांच्या चाळ्यांनीं बोलली असशील; पदराच्या सावरण्यानें बोलली असशील; पावलाच्या थबकण्यानें बोलली असशील!—मला वाटलें होतें हिचा उपासमार केला म्हणजे श्रीमंतीच्या सवयी सुटतील; पण जित्याची खोड मेल्याशिवाय जायची नाहीं.—खाऊन खाऊन चटावलेली जीभ, दागदागिने घालून नटलेमुरडलेले काननाक आणि नेसलें सवरलेलें शरीर—हे दागिने, हा शालू, ही मिठाई—कशी तूं वश होणार नाहींस? बोल हे दागिने तुला आवडतात ना?—रत्नपालांनीं अंगावर घालावेतसे वाटत असेल— पुरले हो हौस;—हा शालू शोभेल का तुला?—दासींनीं नेसवला तर चालेल का? अगबाई! किती तरी ही मिठाई!—त्यांनीं घास दिल्याशिवाय तूं खाणारच नसशील!

तारा०:—बाईसाहेब, तुम्ही काय बोलत आहां? करारी बाण्याला वळी पडून ज्यांनीं गुलामगिरी पतकरली त्यांना दागिन्यांचा, शालूंचा व मिठाईचा मोह कसला पडणार? ज्यांचें सुख दागिन्यांत डागळलेलें असतें, शालूंतच गुरफटलेलें असतें, मिठाईतच बुडविलेलें असतें, अशा बायकांचें वर्तन आपण म्हणतां तसें होईल; पण माझें वर्तन तसें कसें होईल? सोन्याला वाहिलेल्या व पोषाखांच्या चकाकीनें चकलेल्या बाया हिऱ्यांच्या दगडांनीं दडपल्या जातील व शालूचे सांपळ्यांत सांपडतील; किंवा मिठाईला मिठी मारणाऱ्या बाया पक्वान्नांच्या पंकांत पडतील; पण बाहेरच्या भपक्याला न भुलतां आत्म्याचे सुखसोहाळे ज्यांनीं भोगले आहेत व त्या सुखापुढें हीं सर्व सुखसाधनें ज्यांना फिकीं वाटतात, त्यांना मोह पाडण्याचें सामर्थ्य रत्नपालाचे जवाहीरखान्यांत कोठून येणार?—बाईसाहेब, हरिश्चंद्राची ही तारामती म्हणजे रत्नपालाची सुवर्णदासी नव्हे!

सुव०:—रत्नपालाची सुवर्णदासी नसेल, पण गुलाम म्हणून खरेदी केलेली माझी मोलकरीण तर खरी—तारामती, तुला गुलामांच्याच पायरीनें वागलें पाहिजे, व बोललें पाहिजे; इतकेंच नव्हे तर गुलामांना न साजेसे



**तारा०:**—बाईसाहेब, हरिश्चंद्राचीही तारामती म्हणजे रत्नपालाची सुवर्णदासी नव्हे.

[ पृ. ६०.

विचारही तूं विसरली पाहिजेस.—तूं गुलाम, तुझें शरीर गुलाम, तुझें मन गुलाम.

तारा०:—बाईसाहेब, मी गुलाम खरीच; नाहीं असें कोणच्या तोंडानें वदूं? माझें शरीर गुलाम खरेंच; पण तें दास्यत्वाच्या कामकाजापुरतें, शरीरकष्ट भोगण्यापुरतेंच. शरीराच्या प्रफुल्लीतपणाचे मालक माझे पति हरिश्चंद्रराज पूर्वींप्रमाणें आजही कायम आहेत; शरीराला फुलविणाऱ्या मनाची मालकीण पूर्वींप्रमाणें माझी मी कायम आहें.—शब्दांचा उच्चार आपल्या स्वाधीन आहे, शब्दांची उत्पत्ति माझ्या स्वतंत्र मनाच्या आधीन आहे.—बाईसाहेब, माझें मन गुलाम नाहीं आणि मनाच्या स्वाधीन असलेले ह्या शरीराचे आचारही गुलाम नाहींत.

सुव०:—तुझें मन आज गुलाम नसलें तर तें उद्यां गुलाम होईल. रिकामे दिमाख दाखवूं नको. तुझ्या मनाला काबीज करण्याकरितां रत्नपालानें ह्या सर्व महालांत गुप्तपणें जे पाश पसरून ठेवले आहेत ते सर्व ह्या सुवर्णदासीनें जर दक्षतेनें तोडून टाकले नसते तर तुझ्या शरीराशिवाय तुझें मन म्हणून कांहीं निराळें व स्वतंत्र आहे हेंही तुला आज ओळखतां आलें नसतें. माझ्या मत्सराच्या पहाऱ्यानें तुझ्या पातिव्रत्याचें रक्षण केलें आहे. उपकार करणाराशींही चढेलपणानें वागणारी तूं मोलकरीण, कोणचा सद्‌गुण तुझ्यांत टिकणार आहे? मुकाट्यानें माझ्यापाशीं कबूल कर, हे दागिने, हे शालू, ही मिठाई रत्नपालानें तुझ्याकडे चोरून पाठविली ना? मुकाट्यानें होय म्हण.—बोल, तर मग कोणीं ही मिठाई तुझ्याकडे पाठविली?

[रोहिदास येतो.

रोहि०:—आई, आई, बाबांनीं पाठविलेला खाऊ कोठें आहे? मला कीं नाहीं भूक लागली आहे भूक.—कोठें आहेग मिठाई?—बाबांनीं पाठविलेला तो हाच ना खाऊ? बाबा आज पेढे पाठविणार होते ना?

तारा०:—तुझे बाबा आणि पेढे! कोठून तुला पाठविणार?—रोहिदासा, तुला कितींदां सांगितलें, तूं खाऊची आठवण पुन्हा पुन्हा कां काढतोस? अरे, आम्ही गुलाम आहों आणि गुलाम पेढेबर्फी खात नसतात.

रोहि०:—बर्फी नाहीं तर भाकरी तर देशील; मला कीं नाहीं भूक

लागली आहे भूक! भाकरी देग आई, एक चत्कोर दे, अगदीं चिमुकली दे, शिळा तुकडा दे, भूक लागली आहे बघ; शिळा तुकडा दे.—बाबा शिळे तुकडे पाठवितात ना? एक तरी तुकडा असेल तुझ्या पदरांत—अर्धा तूं खा अर्धा मला दे—पापुद्र्यांसाठीं मी रडायचा नाहीं.—दे कींग आई एवढासा तुकडा.

सुव०:—तुकडेमोड्या मधुकऱ्याच्या पोटीं जन्मलेला दिसतो; दळभद्रा मेला! भाकरीचे तुकडे मागतो आहे!

रोहि०:—आई भूक लागली आहे; खरेंच भूक लागली आहे; भाकरीचा एक तरी तुकडा दे.

सुव०:—झोळी घेऊन भिक्षा माग मेल्या.—भाकरीचा तुकडा दे!—ठेवला आहे तुझ्या बापानें भाकरीचा तुकडा! उठल्या बसल्या मेल्याचें तोंड चाललें पाहिजे; क्षणभर तोंडांत कांहीं नसलें कीं आई भूक लागली म्हणून केलेंच मुलानें तोंड वांकडें!

रोहि०:—आई, भूक लागलीग; पोट पाठीलाकींग मिळालें! आजच्या दिवसांत एवढासा तरी तुकडा मला दिलास का? पाणी पिऊन कालची भूक थांबली; आज काय झालें कोणाला ठाऊक! आजचें पाणी कीं नाहीं अगदीं हलकें होतें; भूक विजालीच नाहीं; तोंडांतच आज पाणी उडून गेलें; आग लागल्यासारखें इथें इथें पोट जळतें ग आई! पाणी देशील तें कालच्या सारखें दाट दाट दे, वरच्यावर उडून जाणारें नको, म्हणजे आग विझेल.

सुव०:—कार्टा दुष्काळांत जन्मलेला दिसतो! ह्याच्या पोटाची आग कशानें विजणार आहे? तारे ह्या पोरट्याची 'खा खा खा' पाहून तुला विचारावेंसें वाटतें, हा हरिश्चंद्राचाच ना मुलगा?

[ हरिश्चंद्र येतो.

हरि०:—हा माझाच मुलगा. (उचलून घेऊन चुंबन घेत) हा माझाच मुलगा!

रोहि०:—(तारामतीजवळ जाऊन) आई, बाबा बघ किती तरी खाऊ मला देत आहेत; तूंच तेवढी खाऊ देत नाहींस.

तारा०:—रोहिदासा, तुझे बाबा स्वतंत्र आहेत, मी विकली गेलेली आहें.

हरि०:—बाईसाहेब, आपली दासी तारामती हिच्याशीं मला दोन शब्द बोलावयाचे आहेत.

सुव०:—तुला जें कांहीं तारामतीला सांगायचें असेल तें तूं आमच्या समक्ष सांगितलें पाहिजेस.

हरि०:—तारामती, रोहिदासाचा उपासमार होऊं नये म्हणून मी रोज अर्धी भाकरी तुला पोंचवीत असें, पण तीन दिवसांनीं ही अर्धी भाकरीही मजपासून रोहिदासाला मिळणार नाहीं.—तीन दिवसांनीं दुसऱ्या सहामाहीचा विश्वामित्राचा हप्ता भरण्याचा दिवस येणार व त्यावेळीं गुलाम गिरींत शिरण्याशिवाय दुसरा तिसरा मार्ग मला राहिलेला नाहीं.—मागच्या सहामाहीचा लांकडांचा हिशेब मीं आजच केला, आणि मित्रदासानें बाकी शून्य काढून उलट आजच्या भाकऱ्यांचे पीठही हिशोबांत वळवून घेतलें! आज मला उपाशी पोटानेंच लाकडें फोडावीं लागतील. आजच्या मजुरीनें जें पीठ मिळेल त्यांतील अर्धी भाकरी प्रथम मी रोहिदासाला पोंचवीन व बाकीची मी खाईन. पण तीन दिवसांनीं ही अर्धी भाकरी बंद होईल.

रोहि०:—बाबा, माझी आजची अर्धी भाकरी कोठें आहे? मघाशीं तुम्ही खाऊ दिलातना, माझी भूकच नाहींशी झाली. पण अर्धी भाकरी म्हणतांच पुन्हा भूक लागली.—एक चतकोर मी खाईन, एक चतकोर आईला देईन—आई, तूं चतकोर भाकरी खाल्यावर बाबांच्याप्रमाणें माझ्या गालांवर तूं खाऊ देशील ना? बाबा, माझी अर्धी भाकरी कोठें आहे? काढा, पदरांतून काढा— सोडा गांठ—

हरि०:—बाळा, आतांच सांगितलें ना, आजचें पीठ पूर्वीच्या हिशो-बांतून वळवून घेतलें म्हणून.

रोहि०:—मग मी अर्धपोटीं राहूं?

हरि०:—मीच उपाशी लांकडें फोडणार अर्धपोटानेंच तुझ्या हाडा-पिंडाची वाढ आजचा दिवस होऊंद्या,—आजचाच दिवस काय या पुढें बहुतेक सर्व दिवस तुला अर्ध पोटींच रहावें लागेल.

रोहि०:—माझ्या पोटांत, बाबा इथें इथें भाजल्यासारखें वाटतें, तशी आग रोज पोटांत लागणार का बाबा?

हरि०:—रोज नाहीं लागायची बाळा, थोडे दिवस लागेल; त्या आगीवर कोणी कांहींच शिंपडत नाहीं असें पाहून जो ही आग लावतो तो शरमून जाईल, आणि मग दुसऱ्या दिवशीं आग लावण्याचें बंद करील.

रोहि०:—हां, पोटाला आग लावणाराची अशीच फजीती केली पाहिजे.—आई, मी उद्यांपासून तुझ्यापाशीं खाऊ नाहीं हं मागणार!—बाबा, ही नेहमीं एकसारखी अशी रडायलाच लागते; पोटाला आग लावणाराची खोड मोडण्याची युक्ति जशी आतां सांगितलीत—तसें कीं नाही—हिच्या डोळ्यांतलें पाणी टोंचून टोंचून बाहेर काढणाराच्या सुया बोंथट करण्याची युक्ति काढली पाहिजे.—सांगा बाबा आईला अशी युक्ति, लोकांनीं डोळ्यांत बोटें घातलीं तर त्यांचीं बोटें मोडावींत पण टिपूसभरही पाणी बाहेर पडण्याइतकें लहानसेंही भोंक डोळ्यांना पडतां कामा नये.—बाबा, कशानें हो हिच्या डोळ्यांतलें पाणी बंद पडेल?—हें काय तुमच्याही डोळ्यांतून पाणी बाहेर येऊं लागलें!—बाबा, कशानें हो तुमच्या दोघांच्या डोळ्यांतून पाणी येण्याचें बंद पडेल?

तारा०:—बाळा, उपाशी मुलगा आणि बैरागी नवरा ही जोडी बायकांचे दोन्ही डोळे पाण्यानें नेहमीं भरून ठेवितात. माझ्याबरोबरच माझ्या डोळ्यांतलें पाणी नाहींसें व्हावयाचें आहे.

सुव०:—हरिश्चंद्रा, हा रडण्याचा तमाशा मला दाखविण्याकरितां कां तूं येथें आलास?—हीच का मनोधरणी, तारामती, तूं माझी करणार?—म्हटलें घटकाभर करमणूक होईल म्हणून ही राजाची राणी विकत घेतली. पण मेली सदा रडकी! हरिश्चंद्रा, हिनें ख्यालीखुशालींत असावें म्हणून तिकडून ही मिठाई, ही फलफळावळ, हीं लुगडीं, पाठविण्यांत आलीं आहेत.—ह्या दासी नाहींत का, हासतात, खातात, पितात, खिदळतात, चांगल्या आनंदांत आहेत; तसें हिनें का राहूं नये? ह्या कारट्याच्या पोटाला आमच्या येथें कोण आग लावतो? जेथें तेथें खाण्यापिण्याचे पदार्थ पडलेले असतात, पण पोरट खाईल तर ना? उपाशी राहून

माझ्या डोक्यावर जाचाचें खापर फोडायचें आहेना ह्या मसणीच्या मनांत!—ही इथें कांहीं खात नाहीं, आणि माझ्याशीं वागतांना हिचा इतका तोरा कसा? इतक्या दिवस हें मोठें कोडें होतें; आतां मला समजलें, तूं चोरून ह्या कारट्याला खाऊ देतोस आणि पोटभर भाकर हिला चारतोस.—मी तुला ताकीद देतें, हरिश्चंद्रा, ह्या पावलीं आमच्या वाड्याबाहेर जा, आणि पुन्हा तूं किंवा तुझा निरोप्या कोणी येथें दृष्टीस पडेल तर खबरदार.—चल, ह्या पावलीं चालता हो—हो चालता—हो चालता—जा ग तूं ह्या तुझ्या पोरट्याला घेऊन गुलामखान्यांत जाऊन पड; जा—जा, हो चालती येथून.—पोराच्या पोटांतल्या आगीचा आणि आईच्या डोळ्यांतील पाण्याचा निरंतरचा संयोग करतें, म्हणजे कारट्याच्या पोटांतली आग कायमची विजेल!—एकाच्या पोटांतली आग दुसऱ्याच्या डोळ्यांतल्या पाण्यानेंच विजविली पाहिजे.

[पडदा पडतो.

---

## प्रवेश दुसरा.

[ रत्नपाल व चित्रगुप्त येतात. ]

रत्न०:—चित्रगुप्ता, तारामती माझी कशी होईल, ह्याची कांहीं तरी युक्ति काढ.

चित्र०:—त्याला एक युक्ति आहे; तारामती आपली झाली आहे, असा गवगवा आपण होऊन गांवांत करूं या.—मी बच्याजी दलालाला ही कामगिरी सांगतों, म्हणजे आपल्या व तारामतीच्या विलासांचीं वर्णनें सर्वांना तो ऐकवील—

रत्न०:—त्याला कांहीं खरेपणा नको का? लहानशा खऱ्याच्या पायावर अगडबंब खोट्याची इमारत रचतां येते; पण पायाच्या ठिकाणीं कांहीं तरी खरें पाहिजे ना?

चित्र०:—माझ्या हिशोबाच्या वह्या तसल्या खऱ्याच्या साक्षीला तयार

करतों; म्हणजे मी हिशोबाच्या वहींत लिहून ठेवतों, रत्नपाल व तारामती ह्या स्वाऱ्या अमक्या तिथीला अमक्या रात्रीं नौकेंत बसून जलविहाराला गेल्या होत्या; त्याचा खर्च पांचशें मोहरा; फुलें शंभर मोहरांचीं, अत्तरें शंभर मोहरांचीं, खाद्यपेयें शंभर मोहरांचीं, पातळ शंभर मोहरांचें, व चित्रदासाचे पेढीनें ही सर्व व्यवस्था ठेविली म्हणून खूष होऊन चित्रदास गुप्तदासाला शंभर मोहरा बक्षीस !—इतका हिशोबी विलास वहींत लिहिला गेला म्हणजे कोणचा न्यायाधीश तारामती तुमची नव्हे असें ठरविणार ?—देतां मला पांचशें मोहरा ? म्हणजे जमाखर्च लिहून टाकतों.—तारामती कबूल नाहीं पण हिशोबावरून उपाध्या-मध्यस्थ-दलाल-कुटण्या तरी सिद्ध होतो कीं नाहीं ?—दलालाची तरी स्थापना खऱ्याखुऱ्या पांचशें मोहरांवर करा—मग तेवढ्या खऱ्यावर खोट्या भेटींची इमारत सहज रचतां येईल.—काढा पांचशें मोहरा ! माझ्या पेढीला हिऱ्यामोत्यांची नाहीं तर गुप्त लग्नांची तरी दलाली करूं द्या.

रत्न०:—मी पांचशें सोडून हजार मोहरा देईन; कारण, ह्या कामीं सुवर्णदासीची व माझी चुरस लागली आहे, ह्या शर्यतींत मीं हरतां कामा नये.

चित्र०:—सुवर्णदासीच्या मनांत तारामतीला वश करायची आहे काय ? तसें असेल तर शर्यत तुमच्यामध्यें व सुवर्णदासीमध्यें नसून, माझ्या पेढीच्यामध्यें व सुवर्णदासीच्यामध्यें आहे असें मानलें पाहिजे.

रत्न०:—तें कसें ?

चित्र०:—बायका सुंदर दासी वश करितात, तें विलासाकरितां नव्हे; तर दलालीकरितां. गुप्तलग्नाची दलाली बायकांना चांगली साधते; पण माझ्या हिशोबी पेढीपुढें सुवर्णदासीचेंही कांहीं चालणार नाहीं. माझी वही आणि माझी पेढी ह्या जोडगोळीपुढें एकट्या सुवर्णदासीचें काय चालणार आहे ?—बरें, ह्या शर्यतींत तुमचें तट्टू कोठेसें उभें आहे तें सांगा पाहूं !

रत्न०:—मत्सरामुळें सुवर्णदासी तारामतीचा छळ करते, पोटांत एक अन्नाचें शीतही जाऊं देत नाहीं, म्हणून बभ्रा केला; पण तिनें आपल्या अन्नदानाचे पोवाडे सर्वांनीं गावेत म्हणून सर्व काशीक्षेत्राला भंडारा आज

दिला आहे, आणि शंभर हलवायांचीं दुकानें गोरगरिबांकडून लुटविण्यांत येणार आहेत.—अजून थोडा अवकाश आहे, आतांच कोठें चालला ?—सुवर्णदासीनें तारामतीवरचा आपला ताबा सोडावा म्हणून मी करीत असलेले प्रयत्न निष्फळ होत आहेत.

**चित्र०:**—बाईसाहेबांनीं अन्नदान केलें तर तुम्ही सुवर्णदान करा, म्हणजे तुमचें तट्टू दौड पळूं लागेल; नाहीं तर तुम्ही मागें रेंगाळाल.

**रत्न०:**—किती हजार मोहरा खर्च करूं ?

**चित्र०:**—पांचशें मोहरा जमाखर्चीं विलासाकरितां, तुमच्या स्वतःचे महालांतलि विलासाकरितां, लाखों क्रोडो जितक्या मोहरा खर्च करावयाच्या तितक्या मोहरा खर्च करालच; पण माझ्या वहींतल्या हिशोबी विलासाकरितां पांचशें मोहरा पाहिजेत.

**रत्न०:**—दिल्या, ह्या घ्या. (थैली देतो.) तुम्ही आतां काय करणार ?

**चित्र०:**—जमाखर्च ! तुम्हांला दुसरा कांहीं फायदा नाहीं तरी एवढा तरी फायदा हा होणारच. मूळचा जरी नसला तरी हिशोबावरून तुमचा व तारामतीचा संबंध सिद्ध होणार.—आतां बच्याजी दलाल माझ्या वह्यांतले जमाखर्च वडबडूं लागेल आणि मग सुवर्णदासी खट्टू होऊन आपण होऊनच तारामतीवर नजर ठेवण्याचें सोडून देईल. हिशोबी अस्त्र अमोघ असतें, असा शेटजींचा अनुभव आहेच.

**रत्न०:**—चित्रगुप्त, माझें दुसरें एक काम आहे, आणि तें गुप्त आहे.

**चित्र०:**—विचित्र काम सांगा किंवा गुप्त काम सांगा, वही खांकेंत मारून चित्रगुप्त तयार !

**रत्न०:**—आज हरिश्चंद्राचा लिलांव व्हावयाचा आहे; मी जर लिलांवांत बोलूं लागलों, तर सुवर्णदासीही बोलूं लागेल, आणि मग तें जमायचें नाहीं. तेव्हां मी लिलांवाला येणारच नाहीं. तूं माझ्याकरितां लिलांव बोल; आणि माझ्याकरितां हरिश्चंद्राला विकत घे. नवऱ्याच्या आमिषानें तारामतीची मासोळी जाळ्यांत पकडण्याचा माझा घाट आहे.

**चित्र०:**—हें गुप्त काम मी करतों.—आणखी एक पांचशें मोहरांची थैली द्या मजजवळ.

रत्न०:—( थैली देऊन ) आतां मी स्वस्थ असूं!—काम फत्ते झालें पाहिजे.

चित्र०:—त्याची नको काळजी, हरिश्चंद्राच्या खरेदी-विक्रीचा जमाखर्च लिहून आतां आपणाला दाखवितों.

रत्न०:—अरे, मला जमाखर्च नको आहे. हरिश्चंद्राला तूं मजकरितां प्रत्यक्ष विकत घेतलें पाहिजे.

चित्र०:—जमाखर्चाहून आणखी निराळें प्रत्यक्ष प्रत्यक्ष तें काय असतें? अहो, जमाखर्चच आदि, जमाखर्चच मध्य आणि जमाखर्चच अंत.—आणि हिशोबाच्या कामीं आपण अगदीं निर्धास्त असा. मी तुम्हांला शेवटची युक्ती सांगतों ना; सुवर्णदासी जर फार फार त्रास देऊं लागली, तर गुलामांच्या चौकांत मी तिला पांचशें मोहरांना विकत घेतली, असा वहींत जमाखर्च लिहून टाकतों, आणि तुम्ही हाताला धरून माझ्या पेढींत तिला ढकला, म्हणजे सगळाच तंटा आटोपला.

रत्न०:—हरिश्चंद्र आज माझा गुलाम झाला पाहिजे, समजलास चित्रगुप्ता; नाहीं तर खोट्या जमाखर्चाकरितां कोतवालाकडून तुझ्या मुसक्या बांधवीन.—आज हरिश्चंद्र माझा गुलाम झाला पाहिजे समजलास.

[ जातो.

चित्र:—खोट्या जमाखर्चाकरितां मुसक्या बांधवीन!—जमाखर्च कधीं खोटे असतात?—माणसांना खरें खोटें समजत नाहीं तें आंकड्यांना कसें समजणार?—जन्मांत आज प्रथम मला एक हजार मोहरा एकदम मिळाल्या. कोतवाल खुशाल मुसक्या बांधो, कांहीं झालें तरी ह्या थैलीच्या मुसक्या मी कोणाला सोडूं देणार नाहीं.—हरिश्चंद्राच्या खरेदीचा नुसता जमाखर्च लिहावयाचा; थैलींतून एक मोहर नाहीं बाहेर पडायची! हरिश्चंद्राचे कपाळीं माझी गुलामगिरी असो वा नसो, ह्या मोहरांच्या कपाळीं माझी गुलामगिरी कायमची लागली.

[ बच्याजी येतो.

बच्या०:—अहो, अहो, इथें काय असें उभे? अशा वेळीं रिकामे उभे! सुवर्णदासीनें मेवामिठाईचीं व फराळाचीं शंभर दुकानें लुटण्याचें उदक

## चित्रदास गुमदास पैसेवाले



**चित्र०**:—अहो, जमाखर्चच आदि; जमाखर्चच मध्य आणि जमाखर्चच अंत.

[ पृ. ६८.

आतांच सोडलें.--पायांना, हातांना आणि जिभेला ह्या वेळीं खूप तावललें पाहिजे.--पळा, पळा, चला लुटायला चला.

चित्र०:—ए अन्नपूर्णा, ए गंपु--अरे ए, सर्वजण उठा, पळा, हारेच्या हारे घेऊन चला, ह्या बच्याजीच्या मागोमाग चला; ढलप्या नका वेंचूं !--हारे घेऊन धूम ठोका, आणि दुकानाचीं दुकानें खांद्यावरून आणून पेढींत ओता. पळा--चला;--चला बच्याजी, मी हा तुमच्या मागोमाग आलोंच --ह्या लुटींत पन्नास साठ दुकानें पेढीच्या वांटणीला आलीं म्हणून अगोदर हिशोब लिहून टाकतों, म्हणजे दुसऱ्यांचे हारेही पेढींत बेलाशक चोरून आणून टाकण्यास हरकत नाहीं; आलाच कोतवाल तर टकली वही तोंडावर. हिशोबांत कच्चें नसलें म्हणजे मग काय पाहिजे तें करावें.

[ जातात;

---

## प्रवेश तिसरा.

[ दोन गोसावी आणि दोन भिक्षुक येतात. ]

प०गो०:—गंगामाईच्या प्रसादानें आज बहुत खायाला मिळालें; लोटाही लाडूंनीं भरला आहे.

दु०गो०:—माझ्या लोट्यांत एकच लाडू ढकलायला सांपडला !

प०भि०:—पोटांत दहा पांच पाचुंदे लोटले असशील, मग लोट्यांत कोठून येणार ! मीं दहा पाचुंदे पोटांत आणि दहा पाचुंदे गाठोळ्यांत, अशी लूट केली आहे.

दु०भि०:—आज काशी नगरी ढेकर देऊन सुवर्णदासीला आशिर्वाद देणार.--काय अन्नदान हें ! अरे, ह्या गणपतीचें पोटाएवढें डोकें केव्हां मोठें झालें !

प०गो०:—अरे हा गंपु, हारेच्या हारे डोक्यावर घेऊन पळतो आहे; बेचारा जर ह्या धांदलींत पाय निसरून पडला तर किती मौज होईल !

दु०गो०:—तो आपल्या जवळून गेला म्हणजे हळूंच त्याच्या पोटाला डवचूंया— [गंपू हारा घेऊन येतो.

प०गो०:—अरे, गंपू, केवढें तुझें पोट हें?

प०भि०:—सगळीं हलवायाचीं दुकानें तुझ्या पोटांत मावतील—

दु०भि०:—मग हारे घेऊन कां पळतोस?—हाऱ्याहून पोटच मोठें.

प०गो०:—ह्या कुशींत एक शेंकडा, आणि ह्या कुशींत एक शेंकडा—किती तरी हे लाडू! [पोटावर चापटी मारतो.

दु०गो०:—ह्या कुशींत दोनशें आहेत. [चापटी मारतो.

प०भि०:—दोनशें लाडवांच्या भोंवतीं चार पाट्या शिऱ्यांचा चिखल बसविलेला असला पाहिजे.—पोटावर जरा चापटी मारली कीं हात तुपानें भरून जातात. [चापटी मारतो.

प०गो०:—ह्याचें अंग म्हणजे तुपाची निसरड; आमचा हात टिकतो आहे का? [चापट्या मारतात; गंपू पडतो; हाऱ्यांतले लाडू बाहेर पडतात. अन्नपूर्णा येते.]

अन्न०:—गंपूशेट, गंपूशेट; असें रस्त्यांत काय निजायचें तें! घोटा घरीं घ्यावा, रस्त्यांत घेतल्यानें भलत्याच ठिकाणीं झोंप येते.—मेल्यांनों, असें पाहत काय उभे राहिला, भरा ते लाडू हाऱ्यांत. लहान कोण, मोठा कोण, एवढ्या शेटजींचे हात पाय पसरले आहेत,—हात तरी द्या.—उठरे गंपू!

प०गो०:—तूप बाहेर निथळतें आहे!—जवळ जाऊं नका, निसरडींत तुम्हीही पडाल.

दु०गो० व सर्व०:—बाई, तुम्ही निसरडींत पडाल; चालता बोल तुपाचा बुदला फुटला आहे; पडाल!

अन्न०:—(लाडू भरीत) उठरे बाळा गंपू; गांवच्या चटोर आ. रिकामटेकड्या लोकांना खादीला घातल्यानें सज्जनांची अशीच टवाळकी व्हावयाची! दुर्जनांना केलेल्या अन्नदानानें सज्जनांची निंदा होते.

गंपू०:—(उठत) आईग, मी पडलों तेव्हा कोण कोण हांसलें नीट ध्यानांत ठेव; भांग घ्यायला दुकानांत तरी येऊं देत; बाबांच्याप्रमाणें मीही हिशोबाची वही ठेवल्याशिवाय यांना रडायला लावतां यावयाचें नाहीं.

अन्न०:—बाळा ऊठ.

गंपू०:—कोण हे लाडू दगडासारखे टणक! तोफांच्या गोळ्यांनीं घायाळ होऊन गोळ्यांच्या शय्येवर वीर जसा पडावा, तशी अवस्था ह्या लाडूंनीं माझी केली आहे.—आई, तुला जर लाडू करायला बोलावलें असतें तर असले दगड झालेच नसते.—हंसा, हे दगड खाल्लेत कीं दांतच पडतील!

अन्न०:—काशींतल्या चटोरांना असलेंच अश्वखाद्य पाहिजे, एरवीं ह्यांचे दांत पडावयाचे नाहींत.—ऊठ बाळा. [सर्व हांसतात.

गंपू०:—हांसताहेत बघ.

अन्न०:—हांसूं देत त्यांना; चल तूं! लाडू आपल्या हाऱ्यांत भरावेत; हांसणाऱ्यांच्या दांतांवर टिचूं नयेत; दांत पडल्यावर त्या भगदाडांमधून हे गोळे आयते पोटांत शिरावयाचे!—चल तूं. उद्यां तुम्हा सगळ्यांना पेढीवरच्या हिशोबांत पकडायला सांगतें. [अन्नपूर्णा व गंपू जातात.

प०गो०:—रस्तोरस्तीं लाडू पडले आहेत?—मला वाटतें सर्व पृथ्वी अन्नमय झाली आहे!

दु०गो०:—मला वाटतें, अन्नदानाप्रमाणें गंपुशेटजींचें घोट्याचें दुकान जर लुटायला ठेवलें असतें—

प०भि०:—प्रत्यक्ष कैलासच भूमीवर आला असता!

दु०भि०:—चला आपण गंपुशेटजीच्या दुकानांत जाऊं, लाडवांवर आदळून ठेंचलेलें त्याचें अंग जरा रगडूं, म्हणजे घोटा यथेच्छ फुकट प्यायला मिळेल. [जातात. तारामती व रोहिदास येतात.

तारा०:—अन्नाची ही अशी नासधूस! पण माझ्या बाळाच्या तोंडांत एक कण घाल, असें कांहीं सुवर्णदासीची वाचा वदली नाहीं.—रोहिदासा, कुठें पाहतो आहेस? कशाकडे पाहतो आहेस?—कशाला त्या पक्वान्नाकडे पहातोस—नाहीं हो कोणीं देखील म्हटलें नाहीं, तुझ्या बाळाच्या तोंडांत त्यांतला तुकडा घाल म्हणून.

रोहि०:—आई आज मीं म्हटलें कांग तुला, मला भूक लागली आहे म्हणून? मग तूं कां रडतीस?

तारा०:—बाळा, तूं म्हटलें नाहींस म्हणूनच मी रडतें आहें.—बाळा,

अन्नाची चव—खाऊचा हव्यास—मनुष्याच्या जिभेला आमरण असतो, आणि शरीरपोषणाकरितां ह्या चवीच्या सुखाची जोड मानवकुडीला अवश्य आहे. मरे तों अन्नाची इच्छा जिवंत असली तरी त्या इच्छेची खरी मौज व जरूरी बाळपणींच असते. ऐहिकाच्या पलीकडे ज्याची दृष्टि गेली नाहीं, असला म्हातारा जसा समाजाला त्रासदायक होतो, विषयांत आनंद न मानणारा तरुण जसा समाजाला सौभाग्यदायक नसतो, त्याचप्रमाणें लहानपणींच जिभेला दाबांत ठेवणारा बालक समाज खुरटा करतो. बाळा, तुझ्या बाल्यावस्थेला विसंगत वर्तन तूं माझ्याकरितां करतो आहेस.—माझ्या जीवाभोंवारच्या आंतडीला कसा पीळ पडणार नाहीं ?

**रोहि०:**—नाहींग आई, मला खरोखरच भूक लागली नाहीं; आतांशा भूकच लागत नाहीं.—शिवाय आई, वयापेक्षां प्रसंगानें मनुष्य लवकर मोठा होतो. राजपुत्राचा गुलाम होण्याबरोबर हा चिमुकला रोहिदास एकदम मोठा झाला आहे.—आई, म्हाताऱ्याप्रमाणें मलाही आतांशा भूक लागत नाहीं—पूर्वीं खाऊ पाहिला कीं तोंडाला पाणी सुटे, बघ, बघ, माझी जीभ कोरडी पडली आहे; अगदीं कोरडी पडली आहे,—

**तारा०:**—उपासमारानें रोहिदासा, तुला ताप आला आहे; जीभ कोरडी पडली आहे— जीभ कोरडी पडली आहे!—देवा, ह्याच्या शरीरांतले रस बाल्यावस्थेंतच कसे आटूं लागले !

**रोहि०:**—आई, खरेंच मला भूक लागली नाहीं, पूर्वीं मीं लाडू पाहिला कीं टणटण उड्या मारीत लाडूच्या जवळ जात असें; आतां हें बघ इतके लाडू चोहोंकडे पसरले आहेत, आणि म्हाताऱ्याप्रमाणें पाय कांपत आहेत, हलतच नाहींत.

**तारा०:**—अरे तापानें तुझे पाय कांपताहेत, जीभ कोरडी पडली आहे, अंग धगधगीत लागतें आहे; आणि ज्या भुकेनें तुझ्या ह्या सुकुमार देहाचें हें असें मातेरें केलें ती भूक ओळखण्याचीही शुद्धि तुला राहिलेली नाहीं! फुकट तारामती, तुझा जन्म फुकट! मुलगा उपाशी मरत असतांना अन्नाचा एक कणही तुजपाशीं नसावा, फुकट तुझा जन्म फुकट.—तान्हुल्याला पाहिलें कीं स्वतःच्या रक्ताचें अन्न व पाणी करून

तान्ह्याचें सांगोपन करणाऱ्या स्त्रियांच्या स्तनांनों, माझा बाळ असा भुकेलेला, तान्हेलेला असतांना, तुम्ही कोरडेच्या कोरडे कसे? तान्हुल्याच्या अमृतान्नाचा पान्हा न फुटणाऱ्या स्तनांचा भार वाहण्यापेक्षां देवा, मला वांझ कां केली नाहींस?

**रोहि०:**—आई, मला खरोखर भूक लागली नाहीं, मग तुझ्या स्तनांत दूध कोठून येणार? आई मी आतां मोठा झालों आहें, आणि मोठीं माणसें आईबापांनीं किंवा स्वतःच्या हातांनीं मिळविलेल्या अन्नावर राहतात. माझ्यासारखीं मोठीं माणसें स्तनपान कां कोठें करीत असतात?

**तारा०:**—रोहिदासा, माझें दुर्दैव हेंच, ह्या प्रसंगीं स्तनपान करण्याएवढा तूं लहान नाहींस किंवा स्वतःच्या हातापायांनीं भाकर मिळविण्याएवढा तूं मोठा नाहींस.—ज्या वयांत मुलें आईच्या ताब्यांतून सुटून स्वतःच्या पायांवर उभीं राहण्याकरितां बापाच्या पावलांवर पावलें टाकण्यास शिकत असतात, त्या वयांत तूं आहेस.—रोहिदासा, तापानें तुझें अंग फारच कढत लागूं लागलें आहे—सुवर्णदासी, सुवर्णदासी, अशा वेळीं—भूकेनें असा कहर केला असतांना—ह्या लाडवांच्या प्रदेशांत कशाला आम्हांला पाठविलेंस? तुझ्या अन्नदानाच्या ह्या प्रदर्शनानें भुकेला मानसिक व्यथेचें रूप देण्याचा हा उद्योग कशाला केलास?—बाळा, लाडवांच्या त्या राशीकडे असा कां पाहतो आहेस? तुझ्या अंगांतील तापापेक्षां अन्नावरील तुझी दृष्टि मला अधिक तापदायक होत आहे. हें अन्नदान आमच्या दृष्टिआड होईतों—थोडावेळ—रोहिदासा थोडावेळ नाहीं कारे भूकेची कळ, तुझ्या हातून सोसवत?

**रोहि०:**—आई, मी ह्या हलवायांच्या दुकानांकडे पहात नाहीं—किंवा रस्त्यावर पसरलेल्या ह्या लाडवांकडे पहात नाहीं—मला खरोखर भूक लागली नाहीं. ह्या पक्वान्नांच्या बाजारांत मी आलों, तो रडत बसून तुझ्यापासून खाऊ मागण्याकरितां नव्हे, तर बाबांची गांठ पडेल म्हणून. बाबा आज आम्हांला भेटणार होते नाग?

**तारा०:**—हो—भेटणार होते, पण हे अन्नदानाचे ढीग आमच्या भेटीच्या आड येत आहेत.—बाळा, इतकें निरखून काय पाहतो आहेस?—आपली प्रतिज्ञा सत्य करण्याकरितां ज्यानीं आपलें मन व प्राण मुठींत

धरले आहेत अशा वीरपुरुषाचा तूं मुलगा आहेस.—बेफिकीरपणानें रणांगणावर प्राण फेंकण्याची कला पुष्कळांना साधते, पण ह्या असल्या परिस्थितींत मन व प्राण सदोदित मुठींत ठेवण्याची हातोटी एखाद्याच्याच ठिकाणीं नजरेस पडते!—असली प्रतिष्ठा ज्यानें कमावली आहे अशा महापुरुषाचा तूं मुलगा आहेस,—लाडवांवर खिळून राहिलेली दृष्टि—रोहिदासा—तुला मागें परतवितां येत नाहींका?

रोहि०:—आई, सुवर्णदासीनें हे लाडू जसे रस्तोरस्तीं पसरविले आहेत, त्या प्रमाणें आमच्या बाबांनीं ब्राह्मणांनीं लुटण्याकरितां सोन्याचे ढीग आयोध्येच्या चौकांत घातले होते हें मला माहित आहे; लहानशा फळाचें दान एखाद्या अंधळ्याच्या पदरांत जसें टाकावें त्या प्रमाणें राजमुकुटाचें दान काशींतल्या एका जोग्याच्या हातावर माझ्या बाबांनीं सोडलें आहे हें मला माहित आहे. हरिश्चंद्राच्या मुलाची दृष्टि स्वतःच्या अंगीं खिळवून ठेवण्याची शक्ति लाडवांच्या कणांत आहे असें हरिश्चंद्राच्या बायकोला वाटतें तरी कसें? आई, मीं तुला हजार वेळां सांगितलेंना कीं मला आज भूक लागलेली नाहीं, व पुढें लागणारही नाहीं. माझ्या पायाखालचे मातीचे कण आणि माझ्या सभोंवारच्या अन्नाचे कण हीं दोन्हीं मला सारखींच आहेत. मी ह्या हलवायांच्या दुकानांकडे पाहत नाहीं तर सत्याचें अमृत ह्या पापी सृष्टीवर वर्षाव करणाऱ्या चंद्राकडे—आई, ते बघ, ते बघ, बाबा आले.

[ हरिश्चंद्र येतो.

हरि०:—तारामती, बरी गांठ पडली. अन्नदानाच्या या समारंभांत तुमची व माझी चुकामूक होते कीं काय असें मला वाटलें होतें! रोहिदासाचा चेहरा परवांप्रमाणें आज फिक्कट दिसत नाहीं.—मिष्टान्नाची लाली आज माझ्या बाळाच्या चेहऱ्यावर दिसत आहे.—तारामती, तुझ्या मालकिणीनें तुम्हा दोघांना आज मिष्ट अन्न खाऊ घातलेंना? बरें झालें. मुलाचा सुखी मुखचंद्र तरी मला ह्या वेळीं पहावयाला मिळाला.—गुलाम म्हणून स्वतःची विक्री करण्याकरितां मी आतां विश्वामित्राकडे निघालों आहें.—तुम्ही सुखी आहांत—धनाढ्याच्या घरीं पडला आहांत—खाण्यापिण्याला तुम्हाला कमी नाहीं—रोहिदासा, ये जवळ ये. तुझ्या मालकिणीनें नाना

प्रकारचीं पक्वानें खाऊ घालून तुझें पोट जरी ह्या वेळीं गच्च भरून टाकलें असलें तरी माझ्या हातांना एवढा हा भाकरीचा तुकडा तुझ्या तोंडांत घालूं दे. (रोहिदासाला जवळ घेऊन) हें काय? पेटलेल्या निखाऱ्याप्रमाणें ह्याचे हात कढत कसे लागतात? शरीरांतील अग्नीच्या ज्वाळा ह्याच्या नेत्रांतून ह्या अशा कशा बाहेर पडतात!—मुखचंद्राला म्हणून मी हात लावायला गेलों तों सूर्याच्या तापांत माझे हात कसे होरपळले गेले?

तारा०:—महाराज, आपला मुलगा तीन दिवसांचा उपाशीं आहे, आणि भुकेच्या आगीनें त्याच्या सर्व देहाला ग्रासून टाकलें आहे. समुद्रांत वडवानल जसा राहतो त्या प्रमाणें अन्नाच्या ह्या पर्वताच्या पोटांत सुवर्णदासीच्या छळामुळें आमच्या सभोंवतीं हा भुकेचा वडवानल पेटून राहिला आहे.

रोहि०:—नाहीं हो बाबा नाहीं.—मला भूकच लागली नाहीं,—आणि हें बघा, मला भूक लागायची पण नाहीं. ह्या पक्वानाकडे मीं भुकेच्या दृष्टीनें पाहिलें नाहीं; अन्नदान होत असतां अशाळभूताप्रमाणें मी मालकिणीच्या पुढें उभा राहिलों नाहीं; किंवा ह्या पक्वानाच्या बाजारांतून आमची बळेंच धिंड निघाली असतां भूकेच्या दैन्याचा शब्द मी कोणापाशींच—आईपाशीं—बोललों नाहीं;—सांग ना आई मीं भूक लागली म्हणून म्हटलें का?

हरि०:—तारामती, गुलामगिरींत प्रत्यक्ष शिरण्याचे वेळीं—गुलामगिरीमध्यें आणि माझ्यामध्यें आतां फक्त घटका दीडघटकेची अवधी उरली आहे,—गेल्या खेपेला गुलामांच्या चौकांत उभा असतांना तुझ्या करारी व निश्चयी वर्तनानें वशिष्ट गुरूंचें दर्शन मला गुलामांच्या चौकांत दिलें,—आजचे समयीं रोहिदास माझा गुरू झाला आहे.—अन्नाच्या राशी सभोंवतीं पडल्या असतांना ज्या धैर्यानें हा आमच्या घराण्याची लाज राखतो आहे, तें ह्याचें धैर्य कोणाला मार्गदर्शक होणार नाहीं?

तारा०:—(रोहिदासाचें चुंबन घेऊन) बाळा, तूं आज पितृऋणांतून मुक्त झाला आहेस.

हरि०:—रोहिदासा ये.—गुरुदक्षणा देऊन मला तुझ्या ऋणांतून मुक्त होऊं दे. (जळकी भाकरी पदरांतून सोडून त्याच्या हातांवर ठेवूं लागतो) तुझ्या

शरीराचें संगोपन करणें हें माझें कर्तव्यकर्म आहे म्हणून मी मिळविलेल्या पिठाची ही शेवटची भाकरी मी तुझ्या हातांवर ठेवीत नाहीं; तर विश्वामित्राचें देणें न चुकवितां मला जें कांहीं तुला देतां येण्यासारखें आहे, तें सर्व मी तुला आज गुरुदक्षणा म्हणून देत आहें. [भाकरी हातांवर ठेवतो.

**रोहि०:**—आई, आतां मला भूक लागली. तुला पाहिजे कां ह्यांतला चतकोर? बाबा, हे लाडू पाहून मला भूकच लागत नव्हती. दगड मातीचे हे केलेले असावेत असें मला वाटलें.—अहाहा! ही भाकरी किती गोड आहे तरी!—बाबा तुम्ही अर्धी खा,— मी एक चत्कोर खातों,—आणि आई एक चत्कोर खाऊं दे. [तशी वाटणी करून देतो.

**हरि०:**—माझ्या या बालगुरूचा प्रसाद पुढील कष्ट सोसण्यास माझ्या शरीरांत बल आणूं दे. [हरिश्चंद्र व रोहिदास खाऊं लागतात.

**तारा०:**—हट्टी आणि करारी पुरुषांची ही जात, दुसऱ्यांच्या मिष्टान्नाला पायाखालच्या मातीप्रमाणें तुच्छ मानून करपलेल्या स्वतःच्या भाकरीचे हे कोळसे मिष्टान्नाप्रमाणें मिटक्या मारीत खात आहे!

**रोहि०:**—आई, तूं खाग ती भाकरी, तुला नाहीं का भूक लागली? तुझ्या वाटणीला जळकाच चत्कोर गेला होय?

**तारा०:**—नाहीं, बाळा, मला भूकच लागली नाहीं.

**हरि०:**—तारामती, रोहिदासासाठीं ही चांदोली मी ज्या वेळीं भाजूं लागलों, त्या वेळीं अस्तमानाकडे कललेला हा सूर्य क्षितिजाखालीं जाण्यापूर्वी माझी विक्री झाली पाहिजे, असा निरोप मला विश्वामित्राकडून आला.—गुलामांच्या चौकांतील नियमाप्रमाणें एक महिन्यापूर्वीच माझी विक्री व्हावयास पाहिजे होती; पण पुरुषाचा भाग्योदय कोणत्या वेळीं होतो हें कांहींच वर्तवितां येत नसल्यामुळें महिनाभर विक्री मीं लांबणीवर टाकली. गुलामांच्या चौकांत आज उभे राहून मला माझी विक्री करितां येत नसून मला विकत घेणारा मालक मीं होऊन आज विश्वामित्राच्या पुढें उभा केला पाहिजे. ह्या काशीच्या बाजारांत मला कोण विकत घेणार? चित्रगुप्ताशिवाय व डोंबाशिवाय मला गिऱ्हाईक दिसलें नाहीं. त्या दोघांना मी भेटलों, अधिक किंमत देणाराची मालकी पत्करण्याचें मीं कबूल केलें, आणि

मोहर, अर्धी मोहर, पाव मोहर, जी काय माझी किंमत येणार असेल ती घेऊन विश्वामित्राकडे आतांच्या आतां या म्हणून त्यांना विनंती केली; त्या घाईमुळें रोहिदासा, तुझी चांदोली सबंधच्या सबंध माझ्या हातून करपली गेली!

रोहि०:—नाहीं; बाबा, ती करपलेली नाहीं.—बाहेरून काळी दिसते आहे इतकेंच.—असला खाऊ मीं कधींच खाल्ला नव्हता. आई, तूं खाऊन बघ ग एक तुकडा.

तारा०:—भाकरीचा हा कोळसा, आणि ह्यांत ह्याला अमृताचा घडा सांपडावा अं?—खडकांत पाणी नाहीं का लागत?—देवानें माझ्या बाळासाठीं हें दिव्य औषधच पाठवून दिलें. मला इतक्या दिवस वाटत होतें, आपल्या हाडांरक्ताचें दूध करणारी स्त्रीजात जर जगांत नसती तर लहान मुलांचें संगोपन कसें होतें!—ह्या भाकरीच्या तुकड्यांनीं—ह्या जळक्या कोळशांनीं स्त्रीजातीची ही घमेंड दूर केली आहे—मातेच्या स्तनपानाची गति ज्या ठिकाणीं खुंटते, स्तनांचें ओझें निष्कारण म्हणून मातेला ज्या वेळीं असह्य होऊं लागतें, त्या जागीं व त्या वेळीं पुरुषांच्या तापलेल्या तव्यावरील जळक्या अन्नाचा कोळसा जगांतील सर्व मातांना अधिकारबलानें खालीं पहावयाला लावतो. माझ्या हातांतील ही भाकरी मातांची माता झाली आहे. ह्या भाकरीला ओंठ लावण्याची माझी योग्यता नाहीं. ह्या आईच्या आईला देव्हाऱ्यांत ठेवून मजसारख्या अबलेनें पूजलें पाहिजे. मातेच्या कर्तव्यांतही बाळा रोहिदासा, तुझ्या पित्यानें आम्हां बायकांना आज अबला ठरविलें आहे.—महाराज, काशीच्या बाजारांत आपल्या गुणांची किंमत आज कदाचित् एक मोहरही होणार नाहीं, पण आपल्या हातच्या ह्या चत्कोर भाकरीच्या पासंगाला विश्वांतील सर्व संपत्तिही पुरणार नाहीं. वीरांची उत्पत्ति, वीरांचें संगोपन व वीरांचें तेजोवर्धन ह्या असल्या स्वकष्टाच्या भाकरी करीत असतात! परान्नावर पुष्ट होऊन खोट्या सुखानें गुंगणाऱ्या काशीनगरींतल्या ब्राह्मणांनो, स्वकष्टार्जित भाकरीचें महात्म्य जर तुम्हाला समजेल, तर सर्व विश्वाच्या मूळाशीं असलेली ती जीवन-शक्ति ह्या भाकरीच्या कोळशांत अमृताचा झरा उत्पन्न करणारी ती

आदिशक्ति–तुमच्या घरांदारांतून नांदूं लागेल.–विश्वामित्रा, ये आणि माझ्या हातांतील हरिश्चंद्राच्या संपत्तीचा हा प्रभाव पहा. [ विश्वामित्र येतो.

विश्वा०:—हरिश्चंद्राची कोणची संपत्ति?–माझ्या पांचशें मोहरा, बाई, हरिश्चंद्रानें जादूनें उत्पन्न केल्या आहेत काय?–हरिश्चंद्रा, परमेश्वरी सृष्टींत माझें वर्चस्व जेव्हां मला मनासारखें स्थापतां येईना, तेव्हां बायकांपासून उत्पन्न होणाऱ्या ह्या मानवजातीवर ताण करण्याकरितां वृक्षांतूनच मनुष्य उत्पन्न करण्याचा मीं उद्योग केला; तशाच प्रकारचा एखादा उद्योग करून तूं, हरिश्चंद्रा, मोहरांची अघटित टांकसाळ घातली आहेस काय?

हरि०:—महाराज, असल्या चंचल मार्गानें जाऊन अखेरीस स्वतःची फजिती करून घेणारा हा हरिश्चंद्र नव्हे; वसिष्ठगुरूनें मला तसला धडा शिकविलाच नाहीं.–मनुष्यें आपलें ऐकत नाहींत म्हणून नवीनच मनुष्यें उत्पन्न करावयाचीं, हा समाज आपलें मानीत नाहीं म्हणून नव्या समाजांत अगांतुकाप्रमाणें जाऊन पडावयाचें, ह्या स्वर्गात आपणास इंद्र घेत नाहीं म्हणून नवीन स्वर्ग निर्माण करण्याकरितां लोहपिष्ट खात बसावयाचें–आणि शेवटीं मनुष्याच्या शिराचे कवटीऐवजीं नारळाच्या नरवटीवर किंवा नंदनवनावरील अव्याहत सत्तेऐवजीं कुलंग्या कुत्र्याला होणाऱ्या मेनकेच्या पादस्पर्शावर,–कोल्हा कांकडीला राजी–ह्या न्यायानें–संतुष्ट होऊन मनुष्यापासून देवापर्यंत सर्वांना हिडिसपिडिस करायचें, असल्या अस्थिर, चिरडखोर व नाचऱ्या तपश्चर्येचा अंगिकार वसिष्ठाचा शिष्य कसा करील?–किमयेच्या मंत्रानें मोहरा पाडण्याचा नाद मला नाहीं, जुगाराच्या जोरावर जामदारखाना वाढविण्याचा हव्यास मला नाहीं; काशीनगरींतला बहुजनसमाज हाच माझा जुगार; निरनिराळ्या मनोवृत्तींना संतोषित करण्याकरितां हाडांचीं काडें करणें हेच माझे फांसे; मानवी समाजाच्या महोदधीवर क्षणाक्षणाला नाचणाऱ्या इच्छास्वरूपी लहरींना मर्यादेंत ठेवून गंभीर संसारावर सुखद सौंदर्याचें तरल वस्त्राभरण घालणाऱ्या संभोगी आत्म्याची संयमन-शक्ति हीच माझी किमया! विश्वामित्रमहर्षे, ह्या संपत्तीपुढें मोहरांनीं, हिऱ्यांनीं व मोत्यांनीं मोजतां येणारें वैभव फिकें पडत नाहीं काय?

रोहि०:—बाबांच्या ह्या अपार संपत्तींतील सुख चाखण्यांत आम्ही गुंग झालों आहों; आपणास ह्याची चव जर घ्यावयाची असेल—अतिथि ह्या नात्यानें आपला हक्कही आहे—माझ्या हातांत शिल्लक असलेला चत्कोर मी आपणास आनंदानें देतों.

[ विश्वामित्रास देतो.

विश्वा०:—( भाकरी झिडकारून ) पोरा, मला हिणवतोस काय?—हरिश्चंद्रा, स्वतःच्या कष्टावर कर्ज फेडण्याच्या तुझ्या घमेंडीचा हा परिणाम पहा, धड चत्कोर भाकरीही तुझ्या ह्या उपाशी मुलाला खाववत नाहीं; बालहत्या आणि स्त्रीहत्या करण्याच्या पंथाला तूं लागला आहेस.—नाना प्रकारच्या रसांनीं ओथंबलेलीं पक्वान्नें जिभेपुढें आलीं असतांना त्यांचा अव्हेर करणें आणि भाकरीच्या कोळशांत सर्व रसांची स्थापना भ्रमिष्ट-बुद्धीच्या जोरावर करणें, ह्यांत कोणचा पुरुषार्थ आहे, हेंच मला समजत नाहीं.—तुला खरोखर वाटतें रोहिदासा, त्या कोळशांत अमृत आहेसें?

रोहि०:—माझी जीभ तर अमृताच्या झऱ्याला बिलगली आहे!

हरि०:—सत्याचरणाच्या एकनिष्ठेचा आनंद आपल्या तपश्चर्येला शिवलेला नाहीं. वांझेला पुत्रदर्शनाचें सुख कसें समजून द्यावयाचें?

विश्वा०:—बालहत्या व स्त्रीहत्या यांचें आक्राळविक्राळ स्वरूप प्रत्यक्ष पाहिल्यावर माझें म्हणणें तुला समजेल.—हरिश्चंद्रा, हा सूर्य अस्ताला चालला, तुझा मालक कोण होणार तें मला सांग.

[ चित्रगुप्त व डोंब येतात.

चित्र०:—एक मोहरेहून अधिक किंमतीला हरिश्चंद्राला विकत घेण्याचा तुला अधिकार काय?

डोंब:—माझ्या इच्छेला येईल तेवढ्या किंमतीला मी त्याला विकत घेईन; हरिश्चंद्र स्वतःला विकणार व मी विकत घेणार; एवढ्यालाच तेवढ्यालाच तुम्ही सांगणार कोण?

हरि०:—बरें आलांत वेळेवर.—विश्वामित्रमहर्षीही येथें हजर आहेत.—सूर्य अस्ताला जाण्यापूर्वी मी गुलामगिरींत शिरायला तयार आहें. मला

विकत घेण्याची इच्छा धरणारे हे दोनच गृहस्थ काशीनगरींत आहेत; या दोघांपैकीं जो अधिक किंमत देईल—महिन्याचाही वायदा मला मागतां यावयाचा नाहीं.—सूर्याचा शेवटचा किरण पृथ्वीतलावरून मागें परतण्यापूर्वीं येईल ती रक्कम माझ्या सावकाराचे पदरांत टाकून—सूर्य अस्तास जाण्याबरोबरच माझ्या स्वातन्त्र्याचाही अस्त झाला पाहिजे. ह्या दोघांपैकीं जो अधिक किंमत देईल त्याला त्याच क्षणीं मी स्वतःस विकण्यास तयार आहें.

चित्र०:—ह्याचा पूर्वींचा सवाल एक मोहरच आहे. एक मोहरेहून अधिक बोलायला ह्याला तोंडच नाहीं.—माझा सवाल एक मोहरेवर एक कवडी.

डोंब:—आपण त्या वेळीं शून्यच किंमत हरिश्चंद्राची केली होती.—माझ्या वखारींत लांकूड फोडण्याची जरूरी मला नाहीं, तर माझ्या मालकीचें महास्मशान संरक्षण करणाऱ्या व शिरच्छेदाची ज्यांना शिक्षा झालेली असते त्यांचें शीर धडापासून एका घावांत दूर करण्याच्या माझ्या हक्काची अम्मलबजावणी करणाऱ्या सेवकाची मला जरूरी आहे. आजकाल काशीच्या आसपास यात्रेकरूंना लुटण्याचा धंदा माजलेला असल्यामुळें लायख, धीट सेवक मला मिळत नाहीं; म्हणून म्हणतों भटजी, ह्या कामीं तुम्ही माझी वरचढ करूं नका. तुमच्या वखारीच्या धंद्याचे आड येण्याकरितां मी हरिश्चंद्राला विकत घेत नाहीं; मला धीट नोकर पाहिजे आहे. माझा सवाल शंभर मोहरा.

चित्र०:—अरे वापरे शंभर मोहरा!—यात्रेकरूंची लुटालूट करणाऱ्या चोरांचा तूं गुप्तनायक दिसतोस! कोठून आल्या तुझ्यापाशीं शंभर मोहरा? दाखीव हिशोबाच्या वह्या; नाहींतर माझ्या वह्या पहा आणि गप्प बैस.—माझा सवाल शंभर मोहरांवर एक कवडी.—अरे एका कवडीनें तुझी खोडकी मोडतों.

डोंब:—माझा सवाल दोनशें मोहरा.

चित्र०:—दोनशें मोहरा! दिवाळें काढण्याचा विचार दिसतो? अरे दोनशें मोहरा म्हणजे किती होतात, कांहीं गणीत येतें? अरे दोनदां

शंभर मोजावे लागतात—एकदां नाहीं मोजायचे, दोनदां मोजायचे—अगोदर कारकून हो आणि मग सवाल बोलायला ये.

**डोंब:**—माझा सवाल दोनशें मोहरा.

**चित्र०:**—अरे ही घोरपड किती त्रासदायक होणार आहे कांहीं विचार केलास ? तारामतीला सुवर्णदासीनें विकत घेतलें तर आतां तिला आपला नवरा सोडण्याची वेळ आली आहे; तूं हरिश्चंद्राला विकत घेत-लेस—राजा राण्यांचे डोळे मोठे पापी असतात बरें—तुला तुझी बायको टाकावी लागेल!—आतां उगीच अधिक बोलूं नकोस.—माझा सवाल दोनशेंवर एक कवडी.

**डोंब:**—माझा सवाल तीनशें मोहरा.

**चित्र०:**—हं ! आज तूं अगदीं हातघाईवर आलास. तुला दुसरें एक बिंग सांगतों.—राजेलोकांचे डोळे जसे पापी असतात तशी जीभही चवचाल असते. ह्या बाईला आणि ह्या पोराला खादीला घालतां घालतां सुवर्णदासी अगदीं मेत्याकुटीस आली आहे; आणि उद्यांपासून ह्या पोर-ट्याला घरांतून हांकून देणार आहे.—मग तुला ह्याला पोसावें लागेल.—दहा इसमांचें अन्न एकटेंच हें कारटें खाऊन जातें !—आतां लिलांव वाढवूं नकोस. माझा सवाल तीनशें मोहरांवर एक कवडी.

**डोंब:**—माझा सवाल चारशें मोहरा.

**चित्र०:**—आणि उद्यां ह्या कारट्याला खादीला काय घालशील ? विचार केलास ?—अरे, इतकीं हलवायाचीं दुकानें सुवर्णदासीनें नुकतींच लुटविलीं तरी तेथील सगळें खाऊन पुन्हा निर्लज्जपणानें जळक्या भाकरीचे तुकडे हें पोर मोडतें आहे !—बघ ती जळकी भाकरी बघ हातांत; तुला न जाळतांही हें कारटें खाऊन फस्त करील. महास्मशानांतील आगीहून अधिक भयंकर आग ह्याच्या पोटांत पेटलेली आहे.

**हरि०:**—मला पांचशें मोहरांची जरूरी आहे. मला ऋणमुक्त होऊन गुलामगिरींत शिरूं द्या.

**रोहि०:**—डोंबा, माझ्या बाबांना पांचशें मोहरांना विकत घे, व त्यांचे हातून विश्वामित्राचें ऋण फिटूं दे.

चित्र०:—पांचशें मोहरांना विकत घेऊन तुला काय खादीला घालील? मी एक कवडीही वाढवीत नाहीं. आज मोज चारशें मोहरा, बैस जन्मभर ह्या कारस्थाच्या पोटाची भयंकर खांच भरीत.—माझी एकही कवडी आधिक नाहीं.

डोंब:—माझा चारशें मोहरांचा सवाल आहे.

हरि०:—मला पांचशें मोहरांची जरूरी आहे.

रोहि०:—बा डोंबा, माझ्या बाबांना पांचशें मोहरांना विकत घे, व त्यांच्या हातून विश्वामित्राचें ऋण फिटूं द्या.

चित्र०:—पांचशें मोहरा देऊन तूं कांहीं न खातां जगतोस? माझी एकही कवडी अधिक नाहीं.

डोंब:—माझा चारशें मोहरांचा सवाल आहे.

हरि०:—ऋणमुक्त होऊन मग गुलाभगिरींत मला शिरूं द्या.

रोहि०:—बा डोंबा, माझ्या बाबांना पांचशें मोहरांना विकत घे; व त्यांचे हातून विश्वामित्राचें ऋण फिटूं द्या.

चित्र०:—तें सगळें खरें, पण कारस्या तुझें पोट आडवें येतें आहे ना? तुझ्या पोटाचें तूं काय करणार?

रोहि०:—माझ्या पोटाचें मी काय करणार? हें पोट फेंकून दिलें. (भाकरी फेंकून देतो.) बा डोंबा, माझ्या बाबांना पांचशें मोहरांना विकत घे, आणि त्यांच्या हातून विश्वामित्राचें ऋण फिटूं द्या.—मुलानें बापाचें ऋण डोक्यावर घ्यावें लागतें; पण माझ्यामुळें व माझ्या भुकेमुळें बाबांची किंमत कमी होती आहेसें दिसतें.—बा डोंबा, माझें लोढणें तुझ्या गळ्यांत पडावयाचें नाहीं.—ह्या विश्वामित्रमहर्षींच्या पायांना साक्षी ठेवून मी प्रतिज्ञा करतों, ह्या माझ्या पुण्यशील आईच्या पायांची शपथ घेऊन मी प्रतिज्ञा करतों, ह्या माझ्या सत्यप्रतिज्ञ बापाच्या पायांची शपथ घेऊन मी प्रतिज्ञा करतों, माझी आई व माझे बाबा गुलामगिरींत असेतों, अन्नाचा एकही कण माझी जीभ पोटांत लोटणार नाहीं.

तारा०:—बाळा, कशाला ही प्रतिज्ञा करतोस?

रोहि०:—होय, आई, तुझ्या गळ्याची शपथ वाहून मी प्रतिज्ञा



रोहि०:—हें पोट फेंकून दिलें.

पृ. ८२.

करतों, तुम्ही दोघे गुलामगिरींत असेतों अन्नाचा एकही कण माझी जीभ पोटांत लोटणार नाहीं;—

हरि०:—रोहिदासा, काय हें आरंभिलें आहेस ?

रोहि०:—बाबा, तुमच्या सत्यप्रतिज्ञशीलाची शपथ घेऊन मी प्रतिज्ञा करतों, माझी आई व माझे बाबा गुलामगिरींत असेतों अन्नाचा एकही कण माझी जीभ पोटांत लोटणार नाहीं.—बा डोंबा, माझी आडकाठी मनांत आणूं नकोस, आणि ह्या सत्यप्रतिज्ञ राजाला पांचशें मोहरांना विकत घे.

डोंब:—माझा सवाल पांचशें मोहरा.

हरि०:—मीं मला पांचशें मोहरांना ह्या डोंबाला विकलें आहे.

चित्र०:—माझी वर एक कवडी आहे ना ?

डोंब:—माझी खरेदी पुरती झाली.—मी अगोदर पांचशें मोहरा बोललों, व लगेच विक्री झाली.

चित्र०:—अगोदर कसा बोलशील ? ही पहा हिशोबाची वही, मी अगोदरच पांचशें मोहरा विश्वामित्राचे नांवानें जमा लिहिल्या आहेत व हरिश्चंद्राला विकत घेतलें म्हणून लिहिलें आहे; प्रथम जमाखर्च लिहिला आणि मग येथें आलों !—ह्या जमाखर्चाचे जोरावर हरिश्चंद्र माझा गुलाम झाला पाहिजे.

विश्वा०:—पांचशें मोहरा बरोबर आणल्या आहेत का ?

चित्र०:—आपल्या नांवानें जमा लिहिल्या आहेत; द्यायला कशाला पाहिजेत.—पैसेच जर मोजून टिचायचे तर जगांत जमाखर्चाच्या वह्या पाहिजेत कशाला ?

विश्वा०:—आपण पांचशें मोहरांची रक्कम आणली आहे काय ?

डोंब:—ह्या पांचशें मोहरा. [ थैली देतो.

विश्वा०:—( थैली घेऊन ) डोंबा, ह्या क्षणापासून हरिश्चंद्र तुझा गुलाम झाला आहे.—हरिश्चंद्रा, तूं माझें देणें दिलेंस; मीं तुला सोडलें नव्हे, तर तूं माझें देणें दिलेंस.

तारा०:—महर्षे, ह्यांना सत्यप्रतिज्ञ असें आतां म्हणण्यास हरकत नाहीं.

विश्वा०:—अजून नाहीं; दुसरा करार करून पहिला करार ह्यानें पुरा केला आहे.—हरिश्चंद्रा, तुझ्या जिवंतपणाच्या स्मशानयात्रेस तूं आतां आरंभ कर; माझा आणि तुझा करार संपला, पण हा गुलामगिरीचा दुसरा करार पहिल्या कराराहून अधिक कठिण आहे. हा पुरा करितांना माझ्या मदतीची जर तुला जरूरी वाटली तर तूं मला हाक मारण्यास विसरूं नकोस. मी तुझ्यावर दया करायची व ती तूं घ्यावयाची, अशांतला भाग उरलाच नाहीं; मला तुला इतकेंच सांगणें आहे, स्मशानांत उपरति होण्याची जर वेळ आली तर दया भाकण्यांत, ह्या डोंबाची दया भाकण्यांत, कमीपणा मानूं नकोस ! [ जातो.

चित्र०:—(स्वगत) हरिश्चंद्र आपल्या हातचा गेला; जाऊं द्या, रत्नपालाच्या पांचशें मोहरा तर गांठीं पडल्या.—ह्या विश्वामित्राला पांचशें मोहरा रोख मिळाल्या आहेत; माझ्या पेढींत ठेव ठेवतो का, खटपट केली पाहिजे; नाहीं तर धुमीजवळून एखादा चोर चोरून न्यावयाचा.

[ जातो.

डोंब:—हरिश्चंद्रा, ही सायंकाळची वेळ स्मशानांत प्रवेश करण्यास शुभ समजली जाते; तर असाच माझ्या मागोमाग ये, म्हणजे महास्मशानांतील पहारेकऱ्याचें काम शुभमुहुर्तावर आरंभ केल्यासारखें होईल. [ जातो.

हरि०:—जा, तारामती जा; तुझ्या मालकिणीच्या घरीं जा. जा, बाळा रोहिदासा जा, तुझ्या आईबरोबर जा. माझ्या नव्या धन्याचे आज्ञेप्रमाणें मला स्मशानांतील कामास आरंभ करूं द्या.—अपरिहार्य प्रसंगाबद्दल रोजचे रोज खेद करीत बसून तारामती, काय उपयोग ?

तारा०:—महाराज, ह्या मुलानें अन्न वर्ज केलें, कसें ह्याचें संगोपन करूं ?

हरि०:—बाळा रोहिदासा, माझ्या हातून जी प्रतिज्ञा करवली नसती तसली प्रतिज्ञा तूं ह्या वेळीं केलीस !—सर्व पिढ्यांचा तूं उद्धार केलास.—तारामती, अन्नसेवन न करणाऱ्या प्राणांचें संगोपन परमेश्वर जसें करितो तसें रोहिदासाचें संगोपन करण्याची शक्ति तुझ्या प्रेमांत सत्याचरणानें उत्पन्न होईल; आणि मग रोहिदास लवकरच स्वयंसिद्ध होऊन आम्हा

दोघांना गुलामगिरींतून सोडवील.—अग हा पराक्रमी ठरला, आम्हांला गुलामगिरींतून सोडविणार.—सोडवशील ना बाळा?—

**रोहि०**:—हो हो सोडवीन.—आई रडूं नकोस; रोज सकाळीं मला कुरवाळीत जा म्हणजे मला ताप येणार नाहीं; आणि बाबा, तुम्ही मला रोज भेटून मुके घ्या, म्हणजे मला भूकच लागणार नाहीं.—तुम्ही नाहीं आला तर स्मशानांत मी येईन भेटायला.

**हरि०**:—आतां महास्मशानांतच गांठी पडायच्या! तारामती, रत्नपालानें तुला विकत न घेतां सुवर्णदासीनें घेतलें हें जसें त्यांतल्या त्यांत तुझें भाग्य, तसें त्या चित्रदासाचा गुलाम न होतां डोंबाचा मी गुलाम झालों, हें माझें भाग्यच समजतों. सुवर्णदासी स्त्रीधर्मापासून भ्रष्ट झालेली नाहीं, हा डोंब प्रामाणिक आहे.—जा, तारामती, आपल्या मालकिणीच्या घरीं जा.—काशीविश्वेश्वरा, तुझ्या सन्निध स्मशानांत वास करण्यास येत असतांना माझी एवढीच प्रार्थना आहे, तारामतीच्या व माझ्या हातापायांत भरपूर बल ठेव; पांच पांचशें मोहरांना विकत घेतलेल्या ह्या दासांनीं किंमतीहून अधिक कष्ट धन्यांच्या घरीं केले असे सहज उद्गार आमच्या मालकांच्या तोंडून निघूं देत, आणि मग अशा रीतीनें ह्या गुलामगिरीच्या करारांतून सेवेनें मुक्त झाल्यावर, देवा, तुझ्या घरचें आमंत्रण ह्या देहांना येऊं दे.

[पडदा पडतो.

---

# अंक चवथा.

## प्रवेश पहिला.

**स्थळ**—सुवर्णदासीचें मंदीर.

[ बच्याजी प्रवेश करितो ]

**बच्या०**:—सुवर्णदासीनें मला वैद्य आणा म्हणून सांगितलें आणि मी मांत्रिक घेऊन आलों.—गिऱ्हाइकानें मागितलेला माल आपल्याजवळ नसला तर स्वत:जवळचा माल खुलवून गिऱ्हाइकाच्या गळ्यांत त्याला समजूं न देतां कोंबायचा, हेंच तर दलालाचें मुख्य कसब !—वैद्य कोणी माझ्या ओळखीचा नव्हता तेव्हां ओळखीचा मांत्रिक घेऊन आलों झालें; रोगी मरो वा जगो आपण तर नगास नग हजर केला. ( मांत्रिक येतो ) काय, बुवाजी ? काय मंत्र लागूं पडतो का ?

**मांत्रि०**:—अरे तें पोरटें मरायच्या पंथाला लागलें आहे, ह्या असल्या ठिकाणीं मला कां आणलेंस ? मीं तुला कितींदा सांगितलें रोगी बरा होऊं लागला म्हणजे मला बोलावत जा म्हणून; धट्टाकट्टा होऊं लागलेल्या रोग्या-वर मंत्र तेव्हांच लागूं पडतो.

**बच्या०**:—पुष्कळ मजबूत माणसें तुमच्या नादीं लागून मेलीं आहेत, हें मला माहीत आहे; पण येथें तुम्हाला मीं बोलावलें तें रोहिदासाला मारण्या-करितां नव्हे जगविण्याकरितां.

**मांत्रि०**:—मला वाटलें होतें मारणजारणाचा मंत्र जपण्याकरितां मला बोलावलें होतें—मेलेल्याला कोण पुन्हां मारणार ?

**बच्या०**:—त्याला जगविण्याकरितां बोलावलें आहे.

**मांत्रि०**:—मूर्खा, कोणाला जगविण्याकरितां मांत्रिकाला आजपर्यंत बोलावलें आहे का कोणीं ?—जगविण्याचें काम देव करितो; मंत्र जादू तोडगा

ह्यांचें काय काम ? वैद्यराज व मंत्रराज हे काय रोग्यांना जगविण्याकरितां थोडेच आहेत! वैद्य बोलावला कीं रोगी अर्धामुर्धा मरतो; मांत्रिक आला कीं जगण्याची प्राशा रोग्याची नाहीं. मारायला मांत्रिक—माझी सर्व काशींत ख्याति आहे, निम्याहून अधिक लोक माझ्या मंत्रानें मेले आहेत.—अरे, हजार दोन हजार लोक ज्याच्या गोळीला बळी पडले आहेत, त्याला वैद्यराज म्हणतात; आणि लाख दीड लाख ज्यानें होरपळले आहेत त्याला मंत्रराज म्हणतात.—तें कारटें तर मेल्यासारखेंच आहे; स्मशानांत न्यावयाला मला कशाला बोलावलेंस ?

बच्या०:—अरे त्याच वेळेला मोठी दक्षणा मिळते.—अरे स्मशान तर तुझा कल्पद्रुम आणि तेथें जावयाच्या वेळेला तूं हजर नसून कसें चालेल ?—शेंपन्नास मोहरा हासडविल्याशिवाय आतां राहूं नकोस; गिऱ्हाईक गबर आणि गरजू आहे. [सुवर्णदासी व दोन दासी येतात.

सुवर्ण०:—म्हटलें वेणीफणी करायला आज वेळ मिळतो आहे कीं नाहीं! भांग काढायला बसलें आणि कळलें त्या पोरट्यानें शेवटचा सूर धरला म्हणून; भांग वांकडाच आला! वांकड्या भांगावरच आजकाल लोकांची नजर अधिक जाते म्हणून बरें, नाहींतर चारचौघांत तोंड दाखविण्याची सोय नव्हती.—हा वांकडा भांग बरा दिसतो काग ?

पहि०:—पाऊल वांकडें नसलें म्हणजे झालें; मग भांग शोभतोच.

दुस०:—जातीच्या सुंदरांना वांकड्या तिकड्यानेंच अधिक शोभा येते; वीज कधींच सरळ रेषेंत चमकत नाहीं.

पहि०:—आणि भांगाबरोबर पाऊल वांकडें असलें तर पुरुषांचा गराडा कायमचा पडतो.

दुस०:—आणि म्हणूनच विजेला मेघ आपल्या मंडळांत नेहमीं गुरफटून ठेवतात.

सुवर्ण०:—बरें बायांनो, एवढें तरी बरें. आतां तें कारटें मेलें म्हणजे पांच पन्नास महाजन येथें जमतील आणि मी वेडी विद्री दिसतें कीं काय ही मला भीति होती.

दासी०:—हो, हो.

सुवर्ण०:—मुलाला घरघर लागली म्हणून समजलें, कसे बसे चार घास चटपट खाऊन घेतले; मेल्यानें लुगडी चोळी बदलायला देखील मला फुरसत दिली नाहीं.—कायहो बच्याजी, आणखी किती वेळ लागेल? म्हटलें उशीर असला तर वेणीफणी तरी नीट करून घेतें.

बच्या०:—आतां नाहीं बाईसाहेब आपला वेळ वायां जायाचा; हे मांत्रिक आणले आहेत; ह्यांनीं मंत्राचें पाणी शिंपडलें कीं—संपलेंच—वेळ नाहीं जायाचा.—ह्यांना दोनदां मंत्र म्हणावा लागत नाहीं.—एक. वाणी आहेत.

मांत्रि०:—बाईसाहेबांनीं अन्तःपुरांत कांहीं काळ बिनघोर घालवावा; रोहिदासाचा घोर तोंपर्यंत मी लांबवितों.

सुवर्ण०:—चलाग, ह्या दरवाजावरच्या महालांत वेणीफणी करूं या; म्हणजे तेथून कोण येतात जातात तें मला दिसेल.

पहि०:—शालू, चोळ्या त्या महालांत ठेवलेल्या नाहींत.

सुवर्ण०:—कां ठेवलेल्या नाहींत? आमच्या घरीं भीक का लागली आहे? मी कितींदां सांगितलें प्रत्येक महालांत बारा चोळ्या, बारा शालू रोजच्या रोज ठेवले पाहिजेत. मेलं मनुष्यानें घटका दीड घटकेला जर शालू-चोळी बदलली नाहीं, प्रहर तेवढा बदलायचा आणि चोळी तीच रहावी हें देवाला तरी खपेलका? मी आतां पुन्हा तुम्हाला ताकीद देतें, दिवसां ज्या ज्या महालांत मी बसण्याचा संभव आहे तेथें बारा चोळ्या आणि बारा शालू रोजचे नवे पाहिजेत, आणि रात्रीच्या महालांतून दुप्पट ठेवा, समजलांत?

दासी:—हो, हो.

सुवर्ण०:—कोणी आले, तर बच्याजी, मला सांगा.—खरें, चित्रदास कसे अजून आले नाहींत?

बच्या०:—ते महाजनाकडे गेले होते; इतक्यांत महाजन येतील. कोतवालालाही बरोबर घेऊन येतों असें म्हणून ते कोतवालीकडे वळले, मी मांत्रिकांना घेऊन आलों.

सुवर्ण०:—त्यांना मंत्र म्हणायला सांगा.—कोतवाल, महाजन वगैरे बडीबडी मंडळी आली म्हणजे त्यांना उगीच तिष्ठत बसावें लागतां कामा नये.

मांत्रि०:—माझ्या मंत्राचा इतक्या तात्काल गुण येईल कीं कोतवालां-

लाच यावयाला उशीर लागला असें आपण म्हणाल.—बाईसाहेब, मुलाला येथें थोडा वेळ आणायला सांगा, मी एकदां दृष्टी त्याच्यावर टाकतों, मग आपण बसणार आहां त्याच जागीं आपल्या देखत मंत्राचा पाठ करितों.

सुवर्ण०:—जाग रोहिदासाला थोडा वेळ येथें उचलून आणा; आणि मग माझ्या चोळ्या आणि शालू त्या महालांत घेऊन या. [ जाते.

दासी:—आज्ञा, बाईसाहेब. [ जातात

बच्या०:—हें काम तूं चांगलें केलेंस. आपण तरी रिकामें तिष्टत कशाला इथें बसा; भक्षावर दृष्टि टाकली कीं परतला मागें वाघ !

मांत्रि०—झडप टाकली कीं त्याच उसळीसरसा वाघ मागें परतत असतो.—सुवर्णदासीची वेणीफणी पहात बसावयाचें सोडून रोहिदासाच्या प्रेतकळेकडे कोणीं पहात बसावें ?

बच्या०:—बाईसाहेबांच्या देखत म्हणण्यापेक्षां बाईसाहेबांना पहात तूं मंत्र म्हणणार एकूण !

[ दासी रोहिदासाला उचलून आणून निजवितात.

पहि०:—काय पोर द्वाड पहा, आतांपासूनच हातपाय ताटून धरतो आहे.

दुस०:—पुरा सूड उगविणार हा मेला. मरतो आहे तो देखील ताठ्यानें मरतो आहे.—चल आपण शालूचोळ्या घेऊन जाऊं.

[ जातात.

रोहि०:—अयोध्येस माझें विमान घेऊन चला.—थांबला कां ? आई येत आहे बरोबर ? आई, आई—

मांत्रि०:—बच्याजी, चला; मंत्र लागू पडला. बाईसाहेबांच्या वेणीफणीला तरी पुरता आवकाश मिळतो कीं नाहीं—वानवाच. चला, चला.

[ जातात.

रोहि०:—थांबवा जरा विमान; आई येत आहे. येऊंद्या तिला, येऊंद्या तिला. [ तारामती येते.

तारा०:—कोठें नेलें हो माझ्या बाळाला, कोठें नेलें ? नाहीं हो त्यानें अन्नाचा कणही खाल्ला नाहीं; मरण सर्वांनाच आहे, पण आईच्या देखत अन्नत्याग करून मरण्याची पाळी, देवा कोणाही मुलावर आणूं नकोस.—

काय म्हणतां, त्यानें तशी प्रतिज्ञा केली म्हणून.— हो, माझ्या बाळानें प्रीतज्ञा केली आईबाप गुलामगिरींत असे तों अन्नाचा कणही खाणार नाहीं म्हणून.—पण ही चत्कोर भाकरी आहेना माझ्या पदरांत, गुलामगिरींत शिरण्यापूर्वीं त्यांनीं स्वतःच्या हातांनीं ही भाजली आहे!—मुलांनीं कसलीरे, प्रतिज्ञा, रोहिदासा, करायची? मुलांचा जन्म प्रतिज्ञा करण्याकरितां का असतो? प्रातःकाळच्या सुंदर अरुणोदयानें सूर्यांचा रथ मी इथेंच थांबवीन, सूर्यदर्शन दुनियेला घडविणारच नाहीं म्हणून प्रतिज्ञा करून काय उपयोग? विकास पावायला उन्मुख झालेल्या कळीनें सुवासिक पुष्पपरागांना मी कोंडून ठेवून, मिटलेल्या पाकळ्याच विलयाला नेईन म्हणून प्रतिज्ञा केली तर शहाणपणाचें होईल काय?—बाळा, रोहिदासा, गुलामांना प्रतिज्ञा करण्याचा हक्क जसा नाहीं, पतीच्याविरुद्ध वागण्याची शपथ घेण्याचा अधिकार बायकांना जसा नाहीं, त्याप्रमाणें मातेच्या हृदयाला घरें पाडणारी प्रतिज्ञा करण्याची योग्यता लहान मुलांचीही नाहीं.—बाळा रोहिदासा, तुझ्या पित्यानें दिलेला हा प्रसाद तूं थोडासा तरी खाल्लाच पाहिजेस.

रोहि०:—मीं तो प्रसाद सगळाच खाल्ला आहे; आई आणखी खाऊन काय करायचें? तो प्रसाद आयोध्येच्या लोकांना देऊं चल.—चल ना आई, विमानांत बसून चल.

तारा०:—थोडासा तुकडा खा, म्हणजे तुला बरें वाटेल.

रोहि०:—आणखी काय बरें वाटायचें?—आई, मरण वाईट असतें, असें सांगून तुला कोणीं फसविलें बघ! मातीनें पान व्हावें; पानानें फूल व्हावें; फुलानें फळ व्हावें; फळांतून पांखरूं निघावें; पांखरानें काजवा व्हावें; लहान काजव्यानें चांदणी व्हावयाचें; चांदणीनें चंद्र व्हावयाचें; चंद्रानें सूर्य व्हावयाचें; ह्यालाच मरण म्हणतात.—आई, मी मरत नाहीं तर चिमुकला रोहिदास थोरला हरिश्चंद्र चटदिशी होत आहें!—मी जगलों तर किती किती तरी वर्षांनीं आयोध्येचा राजा होईन; पण आज मरून क्षणांत होतों बघ सार्वभौम राजा! [मरतो.

तारा०:—गेला, गेला, माझा बाळ आयोध्येचा सार्वभौम राजा



**तारा०:**—बाळा रोहिदासा, तुझ्या जन्माचें सोनें झालें. [ पृ. ९१.

व्हावयाला गेला!—रोहिदासा, आम्हांला टाकून कां गेलास? शेजारचीं वृद्ध पानें गळून पुन्हा मातींत मिसळत असतात—सोबत्यांचा चक्काचूर होत असतो—मातापितर पाण्यांत कुजून दुर्गंधींत लोळत पडत असतात, इकडे लक्ष पानाचें फूल होतांना नको का द्यायला?—क्रोडो पानें दुर्गंधीच्या मार्गानें पुन्हा मातींत मिसळावींत, तेव्हां एखाद्या पानाचें कमल होतें.—माझा बाळ कमल झाला!—त्यानें प्रतिज्ञा केली होती, आणि प्रतिज्ञेप्रमाणें तो वागला—कमल झाला!—प्रतिज्ञा करणारांना जे हांसत नाहींत ज्यांना प्रतिज्ञा करावीशी वाटते, प्रतिज्ञेच्या स्वरूपांत स्वतन्त्रता ओळखण्याइतकी शुद्धि ज्यांच्या जीवाला असते, त्या शुद्धीच्या—आत्म्याच्या त्या मूळसामर्थ्याच्या—जोमावर जे प्रतिज्ञेप्रमाणें वागूं लागतात—आणि अशा वागण्यानें उत्पन्न झालेल्या दुःखांच्या राशी ज्यांना सुखाच्या लहरी वाटतात—त्यांना—माझ्या बाळासारख्या सत्यप्रतिज्ञ महात्म्यांना मरण म्हणजे दुसरा सुखमय व शक्तिमय जन्मच होय. ज्यांना जीव नाहीं, ज्यांना प्रतिज्ञा नाहीं, ज्यांना प्रतिज्ञेप्रमाणें आचरण नाहीं, त्या नीरस व शुष्क पानांना वेलीपासून सुटल्याबरोबर खाताच्या खड्याचा रस्ता धरावा लागतो; पण माझ्या बाळासारखें सोन्याचें कमल वेलीपासून बळेंच मोडण्याकरितां विमानांत बसून देव येतात! बाळा रोहिदासा, तुझ्या जन्माचें सोनें झालें. आईबापांचे हाल होऊं नयेत म्हणून तूं मेलास—माझी जीभ कशी अन्नाचा त्याग करीत नाहीं? अन्नत्यागाचा सोपा धडा तुझी ही मठ्ठ आई कशी अजून शिकली नाहीं?—मला विमानांत बसायला बोलावतोस—तेंथें शिकवीन म्हणतोस?—नाहींरे मला कोणी विमानांत घ्यायचें नाहीं; माझ्या देहाचें सोनें झालेलें नाहीं.—तुझ्या संगोपनाकरितां मी देहरक्षण केलें—आतां तुझा धडा गिरवितें, आणि मग येतें दुसऱ्या विमानांतून तुझ्या मागोमाग.—मला प्रथम अन्नत्याग करूं द्या.—तुला माझ्यासाठीं मरावें लागलें—

[कोतवाल, चित्रगुप्त, बच्याजी, मांत्रिक, सुवर्णदासी, दासी व नोकर येतात.]

**सुवर्ण०**:—मुलें मारणारी हीच अवदसा.—पकडा हिला.—तारे, चांगलें केलेंस. मुलाला मारून चांगलें यश मिळविलेंस.—पकडा हिला.—पांढऱ्या

पायाची मेली घरांत आल्यापासून आतांपर्यंत एकक्षण कांहीं चैन पडूं दिलें नाहीं.—पकडा म्हणतेना हिला; मुलें मारणारी हीच अवदसा.

[ कोतवालाचे लोक पकडतात.

**कोत०:**—तारे, तूं ह्या तुझ्या मुलाला मारलें आहेस.—बच्याजीनें, चित्रदास पेढीवाल्यानीं, व सुवर्णदासीबाईसाहेबांनीं जी माहिती सांगितली त्यावरून पाहतां हें घोर पाप तुझ्या हातून घडलें आहे, ह्यांत संशय राहत नाहीं.—महाजनांपुढें तुला उभी केली पाहिजे.

**तारा०:**—न्या मला, महाजनांच्या कचेरींत न्या. मी अपराध तरी कोणचा केला ?

**बच्या०:**—कोणचा म्हणजे ? रोहिदासाला मारण्याचा. कायहो मंत्रराज, हा मुलगा कोणच्या रोगानें मेला असावा असें तुम्हांला वाटतें ?

**मांत्रि०**—ह्या मुलाला कोणचाच रोग झालेला नाहीं; आणि हा मेलेला आहे खास.—रोग न होतां जर मनुष्यप्राणी मेला, तर तो मारला गेला असला पाहिजे, असें शास्त्र आहे.

**कोत०:**—सांगा बाई, रोहिदास कोणच्या रोगानें मेला तें तरी सांगा, नाहीं तर त्याला कोणीं मारला तें सांगा.

**चित्र०:**—बाप दाखीव नाहीं तर श्राद्ध कर, आतां सुटका नाहीं.

**सुवर्ण०:**—आमच्या घरांत त्याला रोग कोठला होणार ? इंद्रभुवनासारखें आमचें हें घर; देवांना स्वर्गांत जसें वार्धक्य केव्हांही प्राप्त होत नाहीं, त्याप्रमाणें आमच्या ह्या महालांत मनुष्यप्राणी किंचितही थकला भागलेला कधींही दिसत नाहीं.—अमृतासारख्या अन्नरसानें आमचा हा महाल थपथपलेला, स्वर्गांत देवांना जसें मरण नाहीं त्याप्रमाणें आमच्या ह्या नंदनवनांत कुत्रें देखील आजपर्यंत मेलें नाहीं.—सांगना मग रोहिदास कसा मेला तें.

**तारा०:**—माझा बाळ कसा मेला ? रोहिदासा, तूं कसा मेलास ? माझा बाळ कसा मेला ?—अरुणोदयाबरोबरच पूर्ण खग्रास ग्रहण कसें लागलें ?—चंद्राची कोर दिसते न दिसते तोंच राहूनें त्याला कसें खाऊन टाकलें ?—नाहीं हो, मरणानें माझ्या बाळाला मारलें नाहीं; ह्या दिव्य देहाला शिवण्याची यमाची काय प्राज्ञा ? नाहीं हो ह्या बालसूर्याला ग्रहण लागलें नाहीं; राहूची

काळीं छाया ह्या आत्मयज्ञाच्या तेजोराशींत नष्ट झाल्यावांचून कशी राहील ?—माझ्या बाळाला कोण ग्रासणार, माझ्या बाळाला कोण मारणार ?—अखिल विश्वांत असा समर्थ कोण आहे कीं जो माझ्या बाळाच्या शेजारीं आला असतां अधोमुख होणार नाहीं ?

सुवर्ण०:—मग सांगना रोहिदास कसा मेला तें.

तारा०:—रोहिदास कसा मेला ?—माझा बाळ कसा मेला ! रोहिदासा, कसारे तूं मेलास ? काय सांगूं, मी कसें सांगूं ? मी पामर, मी अबला, मी कोणचे शब्द उच्चारूं ? त्याच्या यशाचें वर्णन मला कसें करतां येईल ? रोहिदास कसा मेला ? माझा बाळ कसा मेला ! रोहिदासानें आत्मयज्ञ कसा केला ? रोहिदासाच्या आत्मयज्ञाकडे पाहिलें कीं बुद्धीला गरगर फिरल्यासारखें वाटतें, मन स्तिमित होतें, वाचा खुंटते !—रोहिदास कसा मेला, माझा बाळ कसा मेला !—बाईसाहेब, रोहिदास कसा मेला ह्याचें वर्णन वैकुंठांत ह्या वेळीं श्रीविष्णूचे पायांजवळ नारदमुनी करीत असतील; रोहिदासानें आत्मयज्ञ कसा केला ह्याचा इतिहास कैलासांत पार्वतीला शंकर ह्यावेळीं सांगत असतील; वडिलांच्या यशाकरितां माझ्या बाळानें मृत्यूच्या तोंडांत आपण होऊन कशी उडी घेतली ह्याचें काव्य ब्रह्ममंडळांत ह्यावेळीं सरस्वतीच्या हृदयांत स्फुरण पावत असेल.—ती सरस्वती अवतार घेऊन जर तुमच्यांत आली, तरच रोहिदासाच्या मरणाचें रहस्य ती तुम्हाला समजून सांगेल.—मी काय सांगूं, माझा बाळ कसा मेला तें.—रोहिदासा, कसारे मेलास ?—माझा बाळ कसाहो मेला ?

कोत०:—बाई, अशा बरळण्याचा उपयोग महाजनांच्या पुढें कांहींही होणार नाहीं.—तुझा मुलगा मेला आहे, आणि त्याला तूं मारलास असा तुझ्यावर आरोप आहे.

तारा०:—मी मारला ?—मी मारला.—रोहिदासा, कसारे मेलास ?—माझा बाळ कसाहो मेला ?

कोत०:—मी सांगतों, रोहिदास कसा मेला, आणि त्याला कोणी मारलें तें.—तारामतीचा आणि रत्नपालाचा वाईट संबंध—

तारा०:—काय हें बरळतां! कसलें काळकूट विष हें ओकतां?—रोहिदासा, कसारे मेलास?—माझा बाळ कसा हो मेला?

कोत०:—रत्नपालाचा आणि तारामतीचा वाईट संबंध सर्व काशीनगरीला माहीत आहे.

बच्या०:—हो, हो; सर्वांना माहीत आहे; मला असा एकही मनुष्य भेटला नाहीं कीं त्याला ही गुप्त बातमी समजलेली नव्हती.

प० दा०:—हो, आमच्या सुद्धां कानावर ह्या गोष्टी आलेल्या आहेत.

दु०दा०:—हो, आम्हीं दासींनीं कसें बोलावें, ह्या भीतीनें तोंडाला इतक्या दिवस कुलूप घातलें होतें इतकेंच.

चित्र०—माझ्या वहींत तर ह्या गुप्त विलासांचा जमाखर्च लिहिलेला आहे!

कोत०:—सर्व काशीनगरीला हें माहीत आहे. हरिश्चंद्राच्या मुलाला हें खपलें नाहीं; त्या बाणेदार मुलाच्यानें तें पहावलें नाहीं; त्या सत्यप्रिय लेंकराला असलें पाप सोसवलें नाहीं.—रोहिदासाचा अडथळा, तारामती, तूं दूर केलास.—स्वतःच्या चैनीकरितां मुलांना मारणाऱ्या दासींचा सुळसुळाट आजकाल काशीनगरींत झाला आहे; आणि ह्या राक्षसिणींना कठोर शिक्षा करून ही दुष्ट संवय दासीजनांत बिमोड करण्याचा निश्चय महाजनांनीं केला आहे.—मुलाला मारणारी दासी पाहिली कीं कर तिचें शिर धडापासून दूर; असा क्रूर न्याय अंमलांत आल्यावांचून बालहत्येचा प्रघात बंद पडायचा नाहीं.—दासींच्या पापी चैनीकरितां प्रजेचा संहार काय म्हणून?

तारा०:—माझी पापी चैन! तारामतीची पापी चैन! हरिश्चंद्राच्या बायकोची पापी चैन! रोहिदासाच्या आईची पापी चैन! कोणाची जिव्हा असें वदूं शकते? शकते कसली, असें वदली, असें वदली, तारामती तुझ्या समक्ष असें वदली!—रोहिदासा, मी तुझ्या पाठोपाठ आलें नाहीं म्हणून मला ही शिक्षा होय?—बालहत्या करणारी मी चांडाळीण—तारामती, कशी तूं अजून जिवंत आहेस!—यश मलिन झाल्यानंतर कशी तूं जिवंत आहेस! दुःखाच्या संवेदना भोगत असतां सत्याच्या जोरावर शरीर यत्किंचितही डगमगत नाहीं, हें दाखवून मलिन यश धुण्याकरितां होय? होय, होय,

त्याचकरितां तारामती, तूं अजून जिवंत आहेस.—न्या, न्या, मला महाजना-पुढें न्या; माझें शिर धडापासून दूर करण्याची मला शिक्षा होऊंद्या; मानेवर घाव पडून शिर धडापासून दूर झाल्यावर हृदयांतील स्वच्छ रक्त कारंज्या-सारखें बाहेर पडून सर्व विश्वाला माझा निर्मलपणा प्रथम दाखवील; आणि नंतर तुमच्या कुत्सित शब्दांनीं दूषित केलेलें हें शरीर धूवून स्वच्छ करील.—न्या, मला न्या; निर्मल विकार वाहणाऱ्या ह्या शरीराचे रक्तांत, स्वच्छ विचार चोहोंकडे पसरविणाऱ्या ह्या हृदयाचे रक्तांत, सत्य प्रतिज्ञेच्या महतीचें ओझें आनंदानें संभाळणाऱ्या ह्या शिराचे रक्तांत, तारामतीला स्नान घाल-ण्याकरितां ह्या क्षणीं न्या. [पडदा पडतो.

---

## प्रवेश दुसरा.

स्थळ—रस्ता.

[ चित्रगुप्त येतो. ]

**चित्र०**:—महाजनसभेपुढें माझी साक्ष सर्वांत उत्तम झाली, मला पांचशें मोहरा तरी इनाम सुवर्णदासीनें दिलें पाहिजे.—खोट्या विलासाचे जमाखर्चाबद्दल रत्नपालाकडून पांचशें मोहरा, आणि तेच जमाखर्च महाजनापुढें हजर केले म्हणून पांचशें मोहरा! जमाखर्चाच्या वह्या ठेवणें आणि कोंबड्या पाळणें सारखें आहे; गांवांत तंटेबखेडे सुरू झाले म्हणजे घडीघडीला नवें अंडें ह्या वह्या घालतात!—आजकाल तर ही माझी वही सोन्याचींच अंडीं घालूं लागली आहे.—ह्या खेपेला ह्या वहीचें वेत पांचशें मोहरांचें ठरलें पाहिजे. ( बच्याजी येतो.) काय बच्याजी, तुझी साक्ष कशी काय झाली? न्यायाधीश महाजनांनीं तारामतीला देहांत शिक्षा दिली ना?

**बच्या०**:—रोहिदासाबरोबरच तारामती महास्मशानाचा रस्ता धरणार!

बरें झालें तुमच्या वखारीला दोन गिऱ्हाइकें मिळालीं.—हरिश्चंद्रानें पक्षपात करून डोंबाचींच लांकडें मागितलीं तर न कळे !

चित्र०:—तें जाऊं देरे; अगोदर तुझी साक्ष कशी झाली तें सांग.

वच्या०:—उत्तम झाली; द्विवेदीची उत्तम झाली; त्रिवेदीची उत्तम झाली; मंत्रराजाची उत्तम झाली; सुवर्णदासीकडून आम्हां सर्वांना दहा दहा मोहरा दलाली—दलाली नव्हे—दक्षणा देखील मिळाली !—आपली साक्ष कशी काय झाली ?

चित्र०:—साक्ष झाली; सुवर्णदासीबाईसाहेब म्हणाल्या उत्तम झाली; मला कांहीं त्यांनीं रोख दक्षणा दिली नाहीं; पांचशें मोहरांचा जमाखर्च लिहिण्यास आज्ञा झाली आहे. स्वतःच्या मिळकतीच्या वेळीं नुसत्या जमाखर्चावर मी भागवून घेत नसतों. [ सुवर्णदासी येते.

सुव०:—तुम्ही त्यांना पाहिलें नाहींत का ? आतां माझ्या मागोमाग आले ! इंगळासारखे त्यांचे डोळे रागानें लाल झाले आहेत.—महाजनांनीं देहांत शिक्षा तारामतीला सांगितली आणि तिच्याकडे मीं पाहिलें; लाल डोळ्यांनीं मला जाळते आहेसें वाटलें; त्या आगीला भिऊन मी रस्त्यांत धांवत आलें तों जिवंत आगीप्रमाणें विश्वामित्र माझ्या दृष्टीस पडला ! अगबाई आलाच तो रागीट. [ विश्वामित्र येतो.

विश्वा०:—तारामतीला देहांत शिक्षा कोणीं दिली ? कां दिली ? रोहिदासाला तिनें मारलें, अशा कोणी साक्षी दिल्या ? काशी नगरी खोटी ठरली काय ? दयार्द्र अंतःकरणानें अग्नीचा तृतीयनेत्र मिटून धरून काशीविश्वेश्वर काशींत राहतात, म्हणून तुम्ही इतकें खोटें बोलावेंत ? परमेश्वराचे घरीं दयेच्या जलाचा प्रचंड ओघ अग्नीचा लोळ होण्यास एक क्षणही लागत नसतो, हें तुम्ही कसें विसरलांत ? कोण कोण किती कवड्याकरितां खोटें बोललांत ?—काय करूं, ह्या हरिश्चंद्राची व तारामतीची परीक्षा पाहण्याचें जर माझे मनानें घेतलेलें नसतें—इथल्या इथें क्रोधानें जाळून तुम्हांला भस्म केलें असतें.—अरे कसला तूं पेढीवाला, कसला तूं श्रीमंत, आणि कसली तूं श्रीमंतीण !—प्रामाणिकपणाशिवाय तुझी पेढी क्षणभर तरी चालेल का ? कारकुंड्या, सचोटीशिवाय व्यवहारांत तुला कधींच यश



विश्वा०:—खोट्याचा बाजार खोट्याचा बाजार !

[ पृ. ९७.

यायचें नाहीं. सचोटी नसल्यामुळें लेखणीची हमाली तेवढी जशी तुझ्या-पाशीं शिल्लक राहिली, त्याप्रमाणें सचोटीशिवाय तुझी पेढी म्हणजे कवडी-कवडीचें डाळपीठ विकणारी व्यापारी हमाली बनेल, हें पक्कें लक्षांत ठेव. खोट्याचा बाजार, खोट्याचा बाजार!—विश्वामित्रा, हरिश्चंद्राच्या सत्त्वाची परीक्षा पाहतां पाहतां तूं ह्या खोट्याच्या बाजाराला सर्वांच्या डोक्यावर मिरे वाटूं दिलेस हं!—बाई तुझ्या श्रीमंतीचा काय उपयोग? एकाला उपाशी मारण्याचें पाप दुसऱ्याला मोतीचूर चारल्यानें नाहींसें होत नाहीं. मरेपर्यंत तूं रोजचा उपास करशील तेव्हांच रोहिदासाला मारल्याच्या पापांतून सुट-शील; सर्व संपत्ति काशीविश्वेश्वराच्या पायापाशीं ठेव तरच तारामतीच्या जाचाच्या पापांतून अंशतः मुक्त होशील.—अरे, काय करूं रे, मीच, मीच, सत्त्वपरीक्षेच्या नादानें तारामतीच्या जाचास आरंभ केला.—असा या पावलीं डोंबाकडे जातों, त्याच्या पांचशें मोहरा त्याच्या अंगावर फेंकतों, आणि हरिश्चंद्राला गुलामगिरींतून मुक्त करतों. मुक्त झालेला राजा हरिश्चंद्रच या काशीनगरींतील खोट्या बाजाराचा पुरा विध्वंस करील.

[ जातो.

चित्र०:—बरें झालें; हा आगीचा लोंढा डोंबाकडे वळला.—मला वाटलें माझ्या हिशोबाच्या वह्या जाळतो कीं काय? म्हणजे माझ्या पेढीचें सगळेंच भांडवल संपलें असतें.—बाईसाहेब, तुम्ही अशा गांगरून काय म्हणून गेलांत!

सुव०:—मला ते तारामतीचे लाल डोळे दिसताहेत.—सगळी संपत्ति मी काशीविश्वेश्वराला देऊन टाकतें, तारामतीनें माझ्या अंगाला आग लावली आहेसें वाटतें.—तो वीस लाखांचा कंठा तो आतांच्या आतां नेऊन मला काशीविश्वेश्वराला दिला पाहिजे; एरव्हीं बरें नाहीं वाटायचें.—चित्र-गुप्ता, तो नकली कंठा तुला बक्षीस दिला होता, तो मला शंभर मोह-रांना विकत दे; तो खरा कंठा, तो खोटा कंठा-सर्व देवाला देऊन टाकतें; हरिश्चंद्राची किंवा तारामतीची सुतळी नको तुमच्या आमच्या घरांत

चित्र०:—माझ्या आजच्या साक्षीच्या पांचशें मोहरा व कंठ्य शंभर मोहरा, सहाशें मोहरा रोख दिल्यांत तर कंठा मिळेल.

सुव०:—ह्या घ्या सहाशें मोहरा. (थैली देते.) कंठा ह्या लौकर पाठवून बच्याजीबरोबर, मला अगदीं दम निघत नाहीं, मोठा दानधर्म करीन तेव्हां तारामतीच्या लाल डोळ्यांचें भूत नाहींसें होईल.

[ जाते.

चित्र०:—बच्याजी, तूं देखील भ्यालेला दिसतोस ?

बच्या०:—जरा भेदरलों आहें खरा. मला विश्वामित्राच्या लाल डोळ्यांची भीति वाटते.

चित्र०:—तूं काय, सुवर्णदासी काय, तुम्ही हिशोबी कारकून नव्हे; असे भ्यायचेच.—बायका चटदिशीं प्रेमांत येतात तर चटदिशीं रागावतात; चटदिशीं हांसतात तर चटदिशीं रडूं लागतात; ह्याचें कारण त्यांना गणित येत नाहीं; हिशोब माहित नाहींत. हिशोबी आंकडे कोणाच्या बाला भीत नाहींत.—आमच्या घराण्यांत महापुरुषाला दरसाल शंभर ब्राह्मण घालून देवीला बोडण भरण्याची चाल आहे; पण अलीकडे नुसत्या जमाखर्चांवर त्यांचें समाधान मी करीत असतों. गेलीं बारा वर्षें श्राद्धाचे ऐवजीं बापाच्या नांवानें दरसाल एक मोहर जमा लिहीत असतों; भूत होऊन मानगुटीवर बाप बसला असलें स्वप्नदेखील मला पडलेलें नाहीं. अरे, बच्याजी तूही जमाखर्चीं श्राद्धपक्ष करायला शीक, म्हणजे जरासा धीट होशील. भूतखेत, कुलदेवता, स्थलदेवता, ग्रामदेवता, सर्वांना मी जमाखर्चानें संतुष्ट करीत असतों.—ह्या विश्वामित्राला मी भितों कीं काय ? काशीविश्वेश्वराच्या नांवानें शंभर मोहरांचा जमाखर्च आतां करणार, कंठा कांहीं केल्या पेटींतून बाहेर निघायचा नाहीं.

[ जातात.

## प्रवेश तिसरा.

**स्थळः**—महास्मशानाचा एक भाग.

[हरिश्चंद्र व दोन चोर येतात.]

हरि०:—काय म्हणतां, तुम्ही पूर्वी मजप्रमाणेंच ह्या स्मशानांत पहारेकरी होतां, मग ही नोकरी तुम्ही कां सोडून दिली?

प० चो०:—आम्ही सोडून नाहीं दिली, आम्ही पळूनच गेलों; आम्ही डोंबाचें गुलाम होतों, आणि गुलामगिरींतून पार पडण्यास पळून जाणें एवढाच मार्ग आम्हांला दिसला.

दु० चो०:—आमच्या सारखी विशाल छाती फारच थोड्यांची असेल; आमच्या हातापायांत जेवढें बळ आहे तेवढें बळ फारच थोड्यांना असेल; असें असून ह्या स्मशानांत गुलामगिरींत खिचमत पडावें हें आम्हांस बरें वाटलें नाहीं.

प० चो०:—म्हणून गुलामगिरीला लाथाडून आम्ही स्वतंत्र चोरीचा धंदा सुरू केला आहे.

हरि०:—काय तुम्ही चोर आहां?

दु० चो०:—होय आम्ही चोर आहों; काशीस येणाऱ्या यात्रेकरूंन आम्ही लुबाडतों.—असें आम्ही कां करूं नये?—मनगटांतील अतुल शक्ति डोंबाच्या घरचें दळण दळण्यांत आम्ही कां खर्च करावी? मांड्यांतील जोम ह्या स्मशानांतल्या मढ्यांवर पहारा करण्यांत कां आम्ही व्यर्थ दवडावा? श्रीमंतांनीं पापाच्या पितरासारख्या जीर्ण हाडांची चैन करावी आणि आम्ही जोरकस हाडांना त्यांच्या गोठ्यांतील घाण काढण्यांत राबावयास लावावें, हा धर्मच आम्हाला पटला नाहीं.

प० चो०:—घाणेड्यांनीं स्वच्छ पलंगावर लोळावें, व स्वच्छ देहांनीं उकिरड्यांत पडावें, हा अधर्म होय. काशीनगरीची ही विपरीत स्थिति सुधारण्याकरितां—घाणीला उकिरड्यांत फेंकण्याकरितां आणि राजपिंड्यांना सिंहासनावर बसविण्याकरितां आम्हांला लुटारू व्हावें लागलें आहे.

हरि०:—तुम्ही आपले करार मोडून गुलामगिरींतून पळून गेलात !

प० चो०:—होय. आन्यायाचे करार मोडण्यासाठींच केलेले असतात.

दु० चो०:—आम्ही आतां जे आपल्याकडे आलों आहों ते येवढ्यासाठींच, आपणही आमच्याप्रमाणें हा गुलामगिरीचा करार ताडकन तोडून टाकावा.

हरि०:—आणि काय करावें ?

प० चो०:—आम्हां लुटारूंचे नायक होऊन, आपल्या धनुर्विद्येनें, क्षात्रतेजानें आणि धर्मबुद्धीनें नवीन राज्य स्थापन करावें.

हरि०:—नवीन राज्य स्थापन करावें !—नवीन राज्य स्थापन करण्याला मला मोकळीक कुठें आहे ? काशीनगरींत येऊन स्वकष्टानें मला हजार मोहरा मिळवावयाच्या होत्या; माझ्या एक वर्षाच्या कष्टाची किंमत हजार मोहरा होईना; तेव्हां माझ्या बायकोचें जन्माचे कष्ट व माझे स्वतःचे जन्माचे कष्ट एक हजार मोहरांना विकावे लागले.

दु० चो०:—हरिश्चंद्रा, हीच प्रथम तुझी चूक झाली; तूं काशीस आलास तो डोक्यावर मोळ्या घेऊन आलास हेंच चुकलें.

प० चो:—काशीच्या बाहेर उभें राहावयाचें, धनुष्याचा टणत्कार सर्व नगरीला ऐकवावयाचा, वीरांना युद्धाला पाचारण करावयाचें, आणि सर्वांचा पराभव करून काशीस नवें सिंहासन स्थापायचें.

दु० चो०:—आणि मग आम्ही सर्वजण सेवक म्हणून आपल्या सिंहासनासभोंवतीं जमलों असतों. सिंहासनाची नोकरी करण्याची ज्यांची योग्यता त्यांनीं प्रेतांची सेवाचाकरी कां करावी ? महाराज, जी गोष्ट प्रारंभींच आपण करावयास पाहिजे होती ती आतां स्मशानांत आल्यावर तरी करा.

हरि०:—बाबांनो, मला काशीस नवें सिंहासन स्थापतां आलें नसतें आणि येणारही नाहीं.—आम्ही राजे लोक काशीस नवखंडाबाहेरची पृथ्वी मानीत आलों आहों; ह्या खंडांत राजा नाहीं, महाजन सत्ताधारी आहेत. चारचौघे महाजन ज्या पद्धतीनें धनधान्य मिळवितात त्याच पद्धतीनें मला राहणें भाग होतें. माझी प्रतिज्ञाच तशी. त्या प्रतिज्ञेनें आंखलेल्या

तटांचे बाहेर माझ्या पराक्रमाचा ओघ वाहूं शकत नाहीं; प्रतिज्ञेच्या मर्यादेचें उल्लंघन माझ्या मनगटांतील क्षात्रतेज करूं शकत नाहीं. माझ्या सत्यमग्न पूर्वचरिताला प्रतिज्ञेचें फल आलें; त्या प्रतिज्ञेनें बांधून मला काशीस आणलें; त्या प्रतिज्ञेनें माझ्या हातांकडून लांकडें फोडविलीं; त्या प्रतिज्ञेनें माझ्या बायकोला गुलामगिरींत ढकलली; त्या प्रतिज्ञेनें मलाही गुलाम केलें आहे; आणि ती प्रतिज्ञा जर मला शेवटास न्यावयाची आहे तर माझ्या धन्याची—ह्या डोंबाची—आज्ञा कायावाचामनेंकरून पाळणें ह्यावांचून मला दुसरा मार्ग नाहीं. ह्या माझ्या धन्याचा जर हुकूम असेल, धनुष्यावर बाण चढवून मी रणांगणावर उभें ठाकावें, तर मी उभा राहीन. नाहीं तर ह्या स्मशानांतील कामें बिनबोभाट करून ह्या स्मशानांत देह ठेवीन.—तुमचें जें काय म्हणणें असेल, तें माझ्या धन्याला सांगा. सांप्रत माझा धनी हेंच माझें दैवत, त्याची आज्ञा हाच माझा मंत्र—

प० चो०:—डोंबापाशीं आम्हीं कांहींच बोलत नाहीं. तो पकडून आम्हांला कोतवालापाशीं नेईल.

दु० चो०:—तो डोंब आलाच, आम्ही जराशानें येतों, आणि आपली समजूत घालतों— [जातात.

हरि०:—मला पांचशें मोहरा किंमत यावी म्हणून माझ्या मुलानें अन्नत्यागाची प्रतिज्ञा करावी, माझ्या बायकोनें स्वतःस विकून घ्यावें, आणि मी डोंबाची नोकरी बजावतांना कराराला पायाखालीं तुडवून नवीन सृष्टि निर्माण करण्याची वाटाघाट करावी, हें संभवतें तरी कसें?—संपला. माझ्या आयुष्यांतील पराक्रम संपला, स्वतःच्या संकल्पानें सभोंवारच्या सृष्टीवर माझें प्रतिबिंब पाडण्याचें माझें तेज नष्ट झालें, मी ह्यापुढें जगांत कोणाचाही—स्वतःचाही कर्ताकरविता नसून दुसऱ्याच्या आज्ञेचा ताबेदार झालों. काल परवां मी लांकूडफोड्याच होतों, पण माझ्या स्वतःच्या प्रेरणेनें माझे हात कुऱ्हाड उचलीत; आज माझ्या हातांत पहारेकरी म्हणून कुऱ्हाडीच्या ऐवजीं हें खड्ग आलें आहे, पण तलवार म्यानांतून काढतांना, तलवार उगारतांना, कोणाच्याही मानेवर तिचा घांव बसतांना, माझ्या शरीराला, माझ्या बाहूला, माझ्या मनगटाला तो डोंब हलविणार.—

शरीर हरिश्चंद्राचें, मनाची कळ त्या डोंबाचे हातांत.—मानवी शरीरानें असें पशूचें जिणें जगण्यापेक्षां अन्नत्यागानें किंवा तलवारीच्या धारेनें ह्या जन्माचा शेवट करीन म्हटलें, तर तें करार मोडल्याहून अधिक वाईट. माझ्या सवेनें माझा धनी खूष न होतां परमेश्वरी इच्छेनें जर मला मरण आलें तर शेवटीं मी निर्दोष तरी भूतलावरून निघून जाईन. प्रथम सेवेच्या पूर्णतेनें व तत्परतेनें मला धन्याला संतुष्ट केलें पाहिजे. धन्याच्या संतोषांत कराराची समाप्ति झाल्यावर अन्नत्यागाच्या तपश्चर्येनें ह्या दुःखी जिण्यापासून हळूं हळूं स्वतःची पिच्छेहाट करून घेण्याचा मार्ग मला खुला होईल. [विश्वामित्र व डोंब येतात.

विश्वा०:—डोंबा, मला ही गोष्ट सहनच होत नाहीं; तूं ह्या पांचशें मोहरा घे आणि आतांच्या आतां हरिश्चंद्राला गुलामगिरींतून मुक्त कर.

डोंब०:—कां म्हणून मी तसें करूं? आहो, माझे लोक लुटारूंच्या टोळींत सामील झाले; मी त्यांना कधींही वाईट रीतीनें वागविलें नव्हतें; पण महाजनांच्या दुराचारामुळें चोऱ्या आणि दरवडे माजून राहिले, आणि दास्यत्वांत असलेले सगळे धीट व धट्टेकट्टे लोक लुटारू बनले. माझ्यासारख्यांनीं आपला धंदा कसा चालवावा!-- मी कोणाशीं वांकडा बोललों नाहीं, वांकडा चाललों नाहीं, आपण कीं आपला धंदा बरा असा सरळ वागत आलों आहें.--आतां जर मी हहिश्चंद्राला सोडलें तर कोतवालानें स्मशानाच्या वधस्थानीं उभ्या केलेल्या बाईला कोणी मारावयाचें? माझें इतक्या दिवसांचें वतन व अब्रू फुकट होईल. तो मागत होता तितकी किंमत देऊन मी हरिश्चंद्राला विकत घेतलें आहे, स्मशानांतील मारेकऱ्याचें काम त्याला करावें लागेल हें मी त्याला बजावलें आहे, शिरच्छेदाची शिक्षा झालेल्या एका बाईला कोतवालानें स्मशानांत आणून उभी केली आहे; स्त्रीजातीवर राजानें खड्ग कसें चालवावें, ह्या सबबीवर मी हरिश्चंद्राला कसा मोकळा सोडीन?--कायरे हरिश्चंद्रा, तुला ह्या स्मशानांतील मारेकऱ्याचें काम करावें लागेल असें विक्रीच्या वेळीं मी बजावलें होतें ना?

हरि०:—होय बजावलें होतें; आणि गुलाम ह्या नात्यानें तें काम बजावण्यास माझी तलवार तयार आहे.

डोंब:—मग ह्या ऋषिवराला मध्यस्थ घालून दास्यत्वांतून सोड-विण्याचें बोलणें कां लावलें आहेस ?

हरि०:—महाराज, नावडतें काम असलें, हृदयाला घरें पाडणारें काम असलें, मनाच्या सर्व सुखांची एकदम होळी करून आत्म्याला करपविणारें काम असलें, तरी हरिश्चंद्रानें मागच्या चोरवाटेनें करारांतून सुटण्याची कधींच इच्छा धरलेली नाहीं.

डोंब:—मग तूं सांगितल्यावरून हे विश्वामित्र रदबदली करीत नाहींत एकूण ?

हरि०:—मी त्यांना मध्यस्थी करायला कधींच सांगितलेलें नाहीं व सांगणार नाहीं.—देहांतशिक्षा झालेल्यांना मारण्याचें काम करण्यास मी एका पायावर तयार आहें.

विश्वा०:—हरिश्चंद्रा, प्रसंगाचें पूर्ण दर्शन व्हावयाच्या अगोदर उगीच वल्गना करूं नकोस.--मी आपण होऊन तुझ्याकरितां तुझ्या दास्यविमो-चनाची भीक ह्या डोंबापाशीं मागत आहें, आणि ती भीक तुझे क्लेश टळावेत म्हणून मागत आहें.

हरि०:—आपण माझ्यासाठीं भीक मागण्याचें कारण नाहीं. गुलाम ह्या नात्यानें जें कर्म आचरणें मला भाग आहे तें आचरीत असतां, भीतीनें जरी माझे डोळे मिटले, मनगट कांपून हातांतील तलवार जरी गळून पडली, आणि हृदय शून्य होऊन शरीर जरी धरणीवर कोसळूं लागले, तरी देखील ह्या हरिश्चंद्राकरितां दास्यविमोचनाची भीक माझ्या मालकापाशीं आपण मागूं नका. असल्या भिकेनें त्या भित्र्या कुचकामाच्या हरिश्चंद्राचें काडीचेंही कल्याण होणार नाहीं. आपल्या तपश्चर्येचा जर मला कांहीं फायदाच द्यावयाचा असेल, तर गांगरल्यामुळें मिटलेल्या डोळ्यांच्या एकदम तपश्च-र्येनें खाचा करा, कांपणाऱ्या हातापायांची शुष्क लांकडें बनवून चितेवर ठेवण्यापूर्वींच तुमच्या क्रोधाग्नींत त्यांना जाळून टाका, आणि नालायखांच्या नरकांतून मी बाहेर पडल्यानंतर माझ्या करारी सत्त्वाला न साजेसें बेहिमत शरीर व मन पुढील जन्मीं मला न देण्याविषयीं परमेश्वरापाशीं आपण रद-बदली करा.—वधस्थानीं खुनी इसमाला उभें केलें आहे ना ?

डोंब:—होय, उभें केलें आहे; आणि आतांच्या आतां जाऊन एका घावानें त्याचें शिर धडापासून दूर केलें पाहिजे.

हरि०:—हा अस्सा मी वधस्थानाकडे जातों, आणि आपण माझ्या मागोमाग येऊन पोंचतां तोंच खुन्याचें शिर धडापासून एका घावानें दूर केलेलें आपल्या नेत्रांना दाखवितों.--विश्वामित्रमहर्षे, स्त्रीजातीवर शस्त्र चालवितांना माझ्या जीवाला अवघड वाटेल हें खरें; पण आत्म्याला तसे क्लेश होत असतांना माझ्या कर्तव्यांत केसभरही फरक होणार नाहीं.--या माझ्या मागोमाग या; आनंदानें व उल्हासानें कवटाळलेल्या रणभूमीवर निकोप काम करण्याची जी संवय माझ्या मनगटाला व खड्गाला लागलेली आहे, ती संवय निरुत्साहाच्या परमावधींत व दुःखाच्या कडेलोटांतही हरिश्चंद्राला सोडून जाणें शक्य नाहीं, हें नीट तपासून घ्या.

[ जातो.

डोंब:—हरिश्चंद्र तर एका पायावर तयार होऊन वधस्थानाकडे गेला, आणि आपण कसली मध्यस्थी चालविली आहे ?

विश्वा०:—बाबा, त्याला अजून माहीत नाहीं. ज्या स्त्रीचा शिरच्छेद करण्यास तो आतां गेला आहे ती त्याची राणी तारामती आहे, हें अद्याप त्याला माहीत नाहीं.--संकटाचें पूर्ण दर्शन झाल्यावर मनाचा हिय्या टिकत नसतो.--प्रसंगीं विव्हल झाल्याशिवाय हरिश्चंद्र राहणार नाहीं; आणि अशा वेळीं दयेचा आधार देणें हें एक परमेश्वरीच कार्य आहे. त्या वेळेकरितां रदबदली दुसऱ्याच्या सांगण्यावरून कशाला करायला पाहिजे?—रानावनांत तपस्व्यांच्या आसनावर बसलों असतांना दुष्काळांत भुकेनें व्याकुळ होऊन नगरांत शिरून मांगाच्या घरचें कुत्र्याचें शिळें मांस चोरी करून मी कसें घेतलें, ह्याची मला आठवण आहे; आणि ही आठवण हरिश्चंद्राविषयींच्या माझ्या दयेला उचंबळवीत आहे! वैऱ्यावरही तसा प्रसंग येऊं नये, असे उद्गार मी त्यावेळीं काढले होते; असें असून हरिश्चंद्राच्या सत्त्वाची परीक्षा पाहण्याच्या नादाला लागून अत्यंत बिकट प्रसंगांत मी त्याला आणून टाकलेलें आहे.--नाहीं माझ्या हातून हें सोसवत नाहीं; डोंबा, मी तुझीं पाहिजे तीं आर्जवें करितों, ह्या क्षणीं हरि-

श्चंद्राला मला परत विकत दे, फुकट दे, दक्षणा म्हणून दे, भीक म्हणून घाल; मी पदर पसरतों; हात पुढें करतों; मला विन्मुख पाठवूं नको. आज एक, उद्यां एक, असला थिल्लरपणा माझ्या नशिबीं आलेला पत्करला, पण नाहीं, माझ्या हातून सोसवत नाहीं, हरिश्चंद्राला मी ह्या हालांत आणून सोडलें हा विचारही माझ्या हातून सोसवत नाहीं.

**डोंब**:—महाराज, आपणांसारख्याला मी कधींच विन्मुख पाठविलें नसतें; पण ह्या प्रसंगीं माझा नाइलाज आहे. दया व धर्म ह्या संबंधाच्या ह्या आपल्या उलटया सुलटया उड्या मला समजतच नाहींत. आपण हरिश्चंद्राची परीक्षा कां व कशी पाहिलीत हें मला समजत नाहीं, आणि आतां आपण हरिश्चंद्रावर दया कोणची करीत आहां, हेंही मला समजत नाहीं. माझ्या संसाराला धोपट मार्ग तेवढा माहीत आहे. माझें काम न अडतां हरिश्चंद्र ज्या वेळीं मला आपणांस देतां येईल त्या वेळीं आतांच्या ह्या याचनेबद्दल दक्षणा म्हणून मी हरिश्चंद्राला आपणाकडे पाठवून देईन. शिरच्छेदाची शिक्षेची अमलबजावणी करणारा दुसरा सेवक मजपाशीं नाहीं; तसा दुसरा गुलाम मिळाला कीं हरिश्चंद्राचा नजराणा--एक कवडीची किंवा कसल्याही आशीर्वादाची अपेक्षा मनांत न धरतां--ह्या डोंबानें आपणाकडे पाठविला आहे, असें समजा. महर्षे, वधस्थानाकडे मला आतां जाऊं द्या.

[ जातो.

**विश्वा०**:—काय करूं! कसें करूं? माझेंच कृत्य मला सोसवेनासें झालें.--कसला अभिमान आणि कसलें काय? ह्या महाजनांनीं शिरच्छेदाची शिक्षा तारामतीला केली तरी कशी?—साध्वीछळाचे पापांत विश्वामित्रा, तूं वाटेकरी आहेसरे वाटेकरी! हरिश्चंद्राचे खड्गाचे व तारामतीच्या मानेच्यामध्यें मी आपली मान ठेवूं का? हरिश्चंद्राचे मनगटाला मी माझें मनगट भिडवून तारवारीचा मार्ग कुंठित करूं का? काय करूं हेंच मला समजत नाहीं; दया आणि धर्म ह्यांचा हा लढा मला उलगडतांच येत नाहीं.--प्रसंगाचें पूर्ण दर्शन घेऊन जी स्फूर्ति हृदयाला होईल त्या स्फूर्तीप्रमाणें हा विश्वामित्र आजपर्यंत चालला आहे, ह्या प्रसंगींही वधस्थानीं

जाऊन हरिश्चंद्र तारामतीचा वध करीत असतां मनाला जें बरें वाटेल तें बेधडक करून मी मोकळा होणार, हेंच विश्वामित्राला योग्य. [ जातो.

---

## प्रवेश चवथा.

**स्थळ**—स्मशानांतील वधस्थान.

[ तारामती झाडाचे बुंध्यावर मान टेंकून उभी आहे; तिच्यापुढें रोहिदासाचें प्रेत ठेवलें आहे. हरिश्चंद्र प्रवेश करतो. ]

हरि०:—पुत्रहत्या करणारे कुलटे, मरायला तयार हो. स्वतःच्या चैनीच्या आड मुलानें येऊं नये म्हणून मुलांना मारण्याचें पाप दासीजनांत फार फैलावलें असून दासीजनाला जबर बसावी म्हणून तुला देहांतशिक्षा देण्यांत आली आहे. कुलटे, तुझा अपराध अमानुष आहे; तेव्हां तुला हालहाल करून मारलें तरी हरकत नाहीं, अशी मला कोतवालानें आज्ञा केली आहे; तथापि स्त्रीवर्गावर हत्यार चालविणें नामुष्कीचें होय असें ज्याला वाटतें अशाच्या हातून आतां वध व्हावयाचा असल्यामुळें एक घावांतच तुझें शिर तुझ्या धडापासून सोडविलें जाईल. ह्या भाग्याबद्दल हरिश्चंद्राच्या ह्या—

तारा०:—कोण हरिश्चंद्र, कोण हरिश्चंद्र? आपल्या तलवारीनें जर तारामतीच्या देहाचा शेवट झाला तर तारामती स्वतःला कां धन्य मानणार नाहीं?

हरि०:—कोण तारामती, कोण तारामती? आणि ज्या पुत्रवधाबद्दल तुला देहांत शिक्षा झाली तो हा माझा मुलगा रोहिदास.--रोहिदास, रोहिदास!--महास्मशानांतच आंतां भेट, असें बोललों होतों!--रोहिदासा, इथें आणि असा मला भेटायला आलास?--रोहिदासा, रोहिदासा, माझ्या बाबा रोहिदासा, गुरो रोहिदासा, देवा रोहिदासा!--माझ्या आंधीं स्वर्ग गांठण्या इतकी कोणची खडतर तपश्चर्या आपण केलीत, कोणचें व्रत आपण पाळ-

लेंत, कोणचें कर्म आपण आचरलेंत.--बाबा, गुरो, देवा,--मुलाला, शिष्याला, भक्ताला दर्शन द्यावयाचें तें उपदेशामृतानें त्याला सन्मार्गाला लावण्याकरीतां; आणि ह्यावेळीं आपण असें मुके कसे, निष्ठुर कसे, कर्तव्य पराङ्मुख कसे?—बोला बाबा, ह्या मुलाला सन्मार्गाची दिशा दाखवा; बोला, गुरो बोला, ह्या शिष्याला कर्तव्याची दोन वचनें ऐकवा; बोला, देवा बोला, ह्या दासाला भक्तिवात्सल्याचें अमृत पाजा.—मी कृतघ्न म्हणून माझ्याशीं बाबा, तुम्ही बोलत नाहीं होय? कुलाचा संभार तुम्ही माथीं घेतला आहे, मी केलेला व करीत असलेला कुलनाश तुम्ही पोटांत नाहीं काहो घालणार?—मी गुरुद्रोही, ह्या माझ्या बालगुरूनें अन्नत्याग केला असतानां धट्टाकट्टा राहून चापून जेवत होतों, म्हणून रागावला होय? वाट सोडून भटकलेल्या शिष्याला पुन्हा ताळ्यावर आणण्याइतकी तुमची सांप्रदाय-निष्ठा जागृत कांहो करीत नाहीं?—पुत्रघातकी, स्त्रीघातकी मी पतित म्हणून देवा मला दूर लोटतां होय? पतित झाला तरी देवा, तुमच्याच सृष्टींतलाना? तुमच्या भक्तवत्सल दृष्टीबाहेर तो कसा जाऊं शकेल?—हां, हा, हां, रागावूं नका, बाबा रागावूं नका; गुरो, क्रोधाविष्ट होऊं नका; देवा, संतापानें तापून जाऊं नका; मी उगीच तुम्हाला बोल लावला. तुमचें पुत्रसंगोपन, तुमची शिकवणूक, तुमची दया, ह्या मूढमतीला चटदिशीं समजली नाहीं. रोहिदासा, स्मशानभूमीवरील ह्या शयनानें, बाप म्हणून मनुष्य प्राणाला जें जें म्हणून दाखवितां येण्यासारखें आहे, गुरु म्हणून जें जें शिकवितां येण्यासारखें आहे, देव म्हणून जें जें देतां येण्यासारखें आहे, तें तें सर्व तूं मला एका क्षणांत एका कृतीनें दाखविलें आहेस, शिकविलें आहेस, आणि दिलेंही आहेस.—तारामती, हे माझे बाबा मला खुणावित आहेत, मी तुझा वध केला पाहिजे; हे माझे गुरू मला पढवीत आहेत, मी तुझा वध केला पाहिजे; हे माझे देव मला बल देत आहेत, मी तुझा वध केला पाहिजे.—तसें करण्यापूर्वीं माझी एकच तुला विनंति आहे, रोहिदासाप्रमाणें तूंही माझे बाबा होण्यासाठीं येथें कशी आलीस? ह्या बाबांना, ह्या गुरूला, ह्या देवाला आतां वाचा उरली नाहीं; ह्या बाबांना वाचा आहे; ह्या गुरूला वाचा आहे; ह्या देवाला

ाचा आहे; मुलाचे, शिष्याचे भक्ताचे शेवटचे कोड पुरवावयाचे होते.— तारामती, सांग रोहिदास कसा मेला, आणि तुला देहांतशिक्षा कशी झाली?

**तारा०:**—महाराज, मी काय सांगूं? पित्याला कर्जमुक्त करण्याकरितां रोहिदासानें अन्न वर्ज केलें; अन्नाचें दूध करून मातेच्या स्तनामार्फत तें रोहिदासाला पाजावें म्हणून ह्या चांडाळणीनें अन्नसेवन केलें, पण परमात्म्याची इच्छा नसल्यामुळें किंवा पूर्वजन्मींचें पाप आडवें आल्यामुळें माझ्या देहांत अन्नाचें दूध झालें नाहीं. अन्न सोडल्यानंतर रोहिदासाचा देह कोठला सजीव राहणार? आपल्या जाचामुळें रोहिदास मेला, असा दोष लागूं नये म्हणून सुवर्णदासीनें बालहत्येचा आरोप मजवर केला, आणि महाजनांनीं मला देहांतशिक्षा केली.

**हरि०:**—सृष्टीची घडीच बिघडलेली दिसते; महाजनांना तरी दोष कां द्यावा? काशीनगरींत पाय ठेवल्यापासून आतांपर्यंत एकही गोष्ट सुरळीत झाली नाहीं.—तारामती, ह्या पापी नगरींत आम्हीं आलों नसून बाहेरून लखलखीत दिसणाऱ्या पण आंतून कुजलेल्या गुप्त नरकांत आम्ही येऊन पडलेलों आहों. [ दोन चोर येतात.

**प० चो०:**—आणि ह्या गुप्त नरकांतून गुप्तपणानें पळून जाणें, हें पाप नाहीं.

**दु० चो०:**—पाप नाहीं इतकेंच नव्हे, तर अशा रीतीनें बाहेर पळून चोरांचें नायकत्व पत्करून ही पापी नगरी स्वच्छ व शुद्ध करण्याचा उद्योग करणें, हें पुण्यश्लोकांचें कर्तव्य होय.

**प० चो०:**—आपण दोघांनीं आमच्या बरोबर येथून चलावें. स्मशानाबाहेर असलेल्या कोतवालाच्या लोकांना पुरून उरण्याएवढा मोठा आमचा जमाव आहे.

**दु० चो०:**—आतां आमचे बरोबर चला; उद्यां उभयतां महाराजांना आम्ही काशीच्या तक्तावर बसवितों.

**हरि०:**—तारामती, हे चोरीचा धंदा करीत असून तुझ्या माझ्यावरील सांप्रतच्या संकटांतून आम्हांला सोडविण्याकरितां आलेले आहेत.

**तारा०:**—महाराज, आपण माझी अशी परीक्षा का पाहतां? मला

देहांतशिक्षा झाली म्हणून मृत्यूला भिऊन प्राणरक्षणाकरितां स्वतःच्या प्रतिज्ञेविरुद्ध वागण्यास मी पतीला सांगीन, असें आपणांस वाटतें तरी कसें?—बाबांनों, अशा रीतीनें वागण्याची जर मोकळीक प्रतिज्ञेनें ठेवलेली असती तर अयोध्येबाहेरच्या प्रत्येक राजाला ह्या महात्म्याकरितां सिंहासन खालीं करावयास भाग पडलें असतें, आम्हीं हें सर्व ह्या एकट्या मनगटानें केलें असतें.—अयोध्येच्या सिंहासनावरून जे खालीं उतरलों तें प्रतिज्ञा सत्य करण्याकरितां; काशीस लांकडें फोडलीं तीं प्रतिज्ञा पाळण्याकरितां; मी गुलाम झालें ती प्रतिज्ञा पाळल्याकरितां, रोहिदास मेला, प्रतिज्ञा पालण्याकरितां. महाराज, ह्या चोरांच्या मोहपाशांत न पडतां आपण माझा शिरच्छेद केला पाहिजे, प्रतिज्ञा पाळण्याकरितां माझा शिरच्छेद आपण केला पाहिजे.

हरि०:—बाबांनो, तुम्ही जा येथून; माझ्या ह्या गुरुची आज्ञा आहे, माझी प्रतिज्ञा पाळण्याकरितां मी माझ्या आवडत्या बायकोचा शिरच्छेद केला पाहिजे.—काशीस नवीन सिंहासन स्थापण्याचा मोह मला कसा पडेल? आजच्या माझ्या ह्या कृत्यानें सर्व विश्वांतील सत्यप्रिय राजांचीं सिंहासनें स्थिर व्हावयाचीं आहेत; माझ्या खड्गानें तोडलेल्या तारामतीच्या शिरावर सत्यमय पृथ्वीची स्थापना होणार आहे; पापाचरणामुळें स्वस्थानापासून भ्रष्ट होऊन पृथ्वीवर कोसळूं पाहणारे तारामंडळ माझ्या प्रतिज्ञापालनानें आज जागच्याजागीं घट्ट बसून पुन्हा दैदीप्यमान् होणार आहे; पापाचें ओझें असह्य होऊन भूभारानें थकलेल्या शेषाला आज माझी तारामती विसावा देईल; पापाच्या अंधकारानें मलिन दिसणाऱ्या ताऱ्यांना आज माझा रोहिदास धुवून पुसून स्वच्छ करील; पापाला कह्यांत ठेवण्याकरितां स्मशानांत अखंड तपश्चर्या करणाऱ्या शंकराला आज माझें हें खड्ग पार्वतीशीं बोलण्याला फुरसत देईल.—सत्याचें साम्राज्य तिन्ही लोकांत स्थापणारांचा नेतो होण्याची वेळ आली असतांना, चोरांचा नायक कोण होणार?—जा, तुम्ही ह्याक्षणीं येथून निघून जा. (चोर जातात.) तारामती, वधस्थानावर शिर ठेव. आमचा हा महायज्ञ पाहण्याकरित आलेल्या देवतांना फार वेळ तिष्ठत ठेवणें योग्य नव्हे.

तारा०:—महाराज, विश्वामित्रानें आपणास सत्यप्रतिज्ञ म्हटलेलें ऐकण्याची तेवढी माझी इच्छा बाकी आहे.

हरि०:—तारामती, तुझें शिर धडापासून मी वेगळें केल्यावर मी सत्यप्रतिज्ञ व्हावयाचा आहें. शिर वधस्थानावर ठेव.

तारा०:—हें माझं शिर वधस्थानावर ठेवलें.

[ पडद्यांत—विश्वा०:—सत्यप्रतिज्ञ हरिश्चंद्रा, सत्यप्रतिज्ञ हरिश्चंद्रा, जरा थांब; सत्यप्रतिज्ञ हरिश्चंद्रा, ह्या विश्वामित्राचें थोडें ऐक.]

तारा०:—महाराज, विश्वामित्रानें आपणांस सत्यप्रतिज्ञ म्हटलेलें मी ऐकलें; मी निरिच्छ झालें.—माझा वध करून प्रतिज्ञेचें आपण पालन करावें. व्रतापासून पराङ्मुख करण्यास विश्वामित्र येत आहे, तर तो यावयाच्या पूर्वींच आपण सत्यप्रतिज्ञ व्हावें.

हरि०:—तारामती, तुझी आज्ञा मला शिरसावंद्य आहे.—हें खड्ग मी उगारलें, घे शंकराचें नांव घे.—जय काशीविश्वेश्वर, जयशंकर, जय हरहर महादेव. [ तलवार उगारतो. शंकर पार्वती प्रकट होतात; व शंकर हरिश्चंद्राची तलवार धरितात, पार्वती तारामतीला जवळ घेते.]

शंक०:—हरिश्चंद्रा, तुझ्या सत्यपालनानें मी संतुष्ट झालों असून मानवी देहाच्या सर्व बंधनापासून, सर्व करारापासून, सर्व प्रतिज्ञांतून तुला, तारामतीला, व रोहिदासाला मी मुक्त केलें आहे. ऊठ, रोहिदासा ऊठ, जरा व मृत्यु हीं मानवी देहाचीं बंधनें ह्यापुढं तुम्हां तिघांना बिलकूल बाधणार नाहींत, सत्यप्रतिज्ञेमुळें मानवी देह धरणारे भूलोकचे तुम्ही देव झालां आहां, इतकेंच नव्हे तर तुमच्या ह्या महायज्ञानें भूलोकच स्वर्ग झाला आहे. ह्या विमानांत बसून मजबरोबर अयोध्येस चला व सत्यप्रतिज्ञ राजाचें राज्य म्हणजे प्रत्यक्ष स्वर्ग असा अनुभव सर्व मानवांना आणून द्या. [ तसें करतात.

समाप्त.

